# नवभारत

धर्म आणि विज्ञान विशेषांक - भाग १

फेब्रुवारी - २०१५



अध्यात्म

विज्ञान

विज्ञान

अध्यात्म



विज्ञान

विज्ञान

अध्यात्म

अध्यात्म

विज्ञान

अध्यात्म

विज्ञान










अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत' ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २०१४ पासून रू. ४००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.










प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक ५। फेब्रुवारी २०१५
माघ/फाल्गुन शके १९३६
वार्षिक वर्गणी ४०० रूपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## फेब्रुवारी २०१५

## अनुक्रमणिका

# संपादकीय

आपले 'नवभारत' मासिक 'प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई' या संस्थेकडून चालवले जाते. 'प्राज्ञपाठशाळामंडळा'च्या अनेक उपक्रमांमध्ये एक महत्त्वाचा उपक्रम असा की, सामाजिक, राजकीय आणि तात्त्विक प्रश्नांवर नाणावलेल्या विद्वानांच्या तसेच जिज्ञासूंच्या चर्चा घडवून आणावयाच्या. १० व ११ मे २०१४ या दिवशी अशीच चर्चा 'धर्म आणि विज्ञान' या विषयावर घडवून आणली गेली. हा कार्यक्रम 'प्राज्ञपाठशाळामंडळ' आणि 'जनता शिक्षण संस्था, वाई' या संस्थेचे 'किसन वीर महाविद्यालय, वाई' यांच्या संयुक्त विद्यमाने 'किसन वीर महाविद्यालया'त घेण्यात आला. सदर चर्चासत्राला सुमारे ७० अभ्यासक उपस्थित होते व ५० जणांनी या ना त्या स्वरूपात चर्चेत भाग घेतला. आम्ही 'जनता शिक्षण संस्था, वाई' या संस्थेचे, तसेच किसन वीर महाविद्यालय आणि त्याचे प्राचार्य यांचे ऋणी आहोत.

'प्राज्ञपाठशाळामंडळ' आणि 'जनता शिक्षण संस्था' यांच्यातर्फे या चर्चासत्राचे नियोजन डॉ. राजेंद्र प्रभुणे व श्री. अनिल जोशी यांनी अतिशय परिश्रम घेऊन केले. चर्चासत्रात भाग घेणाऱ्या विद्वानांकडून शोध-निबंध आणवणे, अभ्यासूंकडून टिपणे जमवणे, इंग्रजी भाषेतील लेखांची मराठीत भाषांतरे करणे ही सर्व कामे डॉ. प्रभुणे यांनी चिकाटीने व निरलसपणे केली. डॉ. प्रभुणे व श्री. अनिल जोशी यांचे फार फार आभार.

या चर्चेत वाचलेले निबंध व टिपणे 'नवभारता'तून प्रसिद्ध करावयाची, हे ठरलेच होते. तथापि 'आपण वाचलेले लेखन साफसूफ करून पाठवू', असे बऱ्याच चर्चकांनी सांगितले. हे लेख मिळविण्यात बरेच दिवस गेले. आता फेब्रुवारी व मार्च २०१५ चे 'नवभारता'चे अंक आम्ही 'धर्म आणि विज्ञान' विशेषांक म्हणून प्रसिद्ध करीत आहोत. आमच्या अभ्यासू वाचकांना आणि या विषयाची जिज्ञासा बाळगणाऱ्या विचारवंतांना या विशेषांकातील लेख उद्बोधक वाटतील, अशी आशा आहे.

प्रा. डॉ. कोलामथडाम हे पुण्यातील 'डी नोबिली महाविद्यालया'चे प्रमुख आहेत. 'धर्म व विज्ञान यांच्यातील संवाद' या विषयावर चर्चा घडवून आणण्याची एक मोहीमच या संस्थेच्या वतीने त्यांनी गेली अनेक वर्षे चालविली आहे. 'प्राज्ञपाठशाळामंडळ' आणि प्रा. डॉ. कोलामथडाम यांचा परिचय जुनाच आहे. त्यांनी आपल्या संस्थेकरवी आमच्या चर्चासत्राला मोठी देणगी दिली. आम्ही प्रा. डॉ. कोलामथडाम यांचे व त्यांच्या संस्थेचे मन:पूर्वक आभार मानतो.

शेवटी कृतज्ञता व्यक्त करावयाची ती या चर्चासत्रात ज्यांनी भाग घेतला, टिपणे सादर केली व निबंध वाचले अशा सर्व अभ्यासकांबद्दल. त्यांनी आपले निबंध आम्हाला प्रसिद्ध करण्यासाठी दिले, त्यामुळेच हे दोन विशेषांक आता प्रसिद्ध होत आहेत.

## श्रद्धांजली

प्राचार्य म. द. हातकणंगलेकर यांचे रविवार दि. २५ जानेवारी २०१५ या दिवशी दु:खद निधन झाले. प्राचार्य हातकणंगलेकरांचा प्राज्ञपाठशाळामंडळाशी आणि मंडळाच्या सभासदांशी आत्मीय संबंध होता. प्राचार्य हातकणंगलेकर एक उत्कृष्ट आणि सहृदय समीक्षक होते. मराठी साहित्यविश्वात घडणाऱ्या घडामोडींचा वृत्तान्त Indian Literature साठी त्यांनी सातत्याने लिहून पाठविला. मराठी साहित्यात भर घालणाऱ्या अनेक लेखकांना त्यांनी उत्तेजन दिले. त्यांची साहित्यसमीक्षा रसग्रहणात्मक होती. प्राज्ञपाठशाळामंडळातर्फे आयोजित विचारसत्रांना ते आवर्जून उपस्थित राहत असत. त्यांच्या निधनामुळे मराठी साहित्यविश्वाला मोठा धक्का बसला आहे. प्राज्ञपाठशाळामंडळाच्या सर्व सदस्यांतर्फे त्यांना विनम्र श्रद्धांजली.

# सौहार्द हरपले

रोहिणी तुकदेव

रविवार दि. २५ जाने. २०१५ रोजी प्राचार्य म. द. हातकणंगलेकर यांचे निधन झाले. अंत्यविधीसाठी त्यांचा मृतदेह हलविला आणि आपल्या हातातून अतिशय मौल्यवान गोष्ट निसटून चालली आहे; पण तिला अटकाव करण्याचे, थांबविण्याचे अथवा ती पुन्हा हस्तगत करण्याचे कोणतेच साधन, सामर्थ्य आपल्याकडे नाही, अशा क्लेशकारक आणि हताश उद्विग्नतेत मी जड पावलांनी स्वत:च्या जगण्यात शिरण्यासाठी घरी परतले. केवळ माझी नव्हे, तर माझ्यासारख्या असंख्य लोकांची, जे जे कोणत्या ना कोणत्या कारणांनी, कमी-अधिक काळासाठी सरांच्या सानिध्यात आले असतील, त्या सगळ्यांची अशीच अवस्था झाली असणार, हे नक्की. आपुलकीचे बंध तयार करण्याची, माणसे जोडण्याची जादुई हातोटी त्यांच्याकडे होते. त्यांच्या जाण्याने मूर्तिमंत सौहार्द, सौजन्य हरपले.

घरी परत आल्यावर, त्यांच्या निधनाने निर्माण झालेली भावनिक अस्वस्थता दूर करण्यासाठी त्यांचे 'उघडझाप' काढून वाचत बसले. त्यांच्या आयुष्यातील पंचाहत्तर वर्षांच्या कालखंडातील आठवणींचा आणि घटनांचा विस्तीर्ण पट समूर्त झाला. लेखणीचे लालित्य जबरदस्त. अगदी थोडक्या शब्दांत व्यक्ती डोळ्यांसमोर उभ्या करण्याचे कौशल्य थक्क करणारे. उदाहरणच सांगायचे तर, केवळ १०-१५ ओळींत वर्णिलेली जनीची हकीकत वाचून पहावी. अगदी अल्पवयात मृत्युमुखी पडलेल्या निष्पाप, देखण्या जनीची आठवण एखाद्या कवितेसारखी हळुवार उलगडत जाते आणि चटका लावते.

उत्कट संवेदनशीलता, सजग सदसद्‌विवेकबुद्धी आणि स्वत:कडे व भोवतालाकडे पाहण्याचा प्रांजळपणा ही त्यांच्या वागण्याबोलण्याची आणि लेखनाची महत्त्वाची वैशिष्ट्ये. काही निवडक कथांचे अनुवाद, अकादमीच्या Indian Literature मासिकात मराठी साहित्यातील वार्षिक

अनुक्रमणिका

घडामोडींबद्दल सातत्याने दहा वर्षे लेखन, मरण आणि वेलबुट्टीसारखे ललित लेख किंवा संपादने आणि त्यांना लिहिलेल्या प्रस्तावना या सगळ्यापेक्षा ते महाराष्ट्राला समीक्षक म्हणून अधिक माहीत आहेत. आपली सहजप्रेरणा ओळखून त्यांनी आस्वादक समीक्षा लिहिली. 'ललितकला, साहित्य यांचे स्वरूप बऱ्याच प्रमाणात अंत:प्रेरणेने जाणायचे असते. त्याची वस्तुनिष्ठता पदार्थविज्ञानातील तथ्यासारखी नसते. भाषा आणि विचार ही सत्यशोधनाची साधने असली तरी त्यात सर्वकाही पकडता येत नाही. आस्वादकाच्या भूमिकेवर त्याचे समाधान असते,' या आपल्या भूमिकेवर ते शेवटपर्यंत ठाम राहिले. 'अभिनिवेशी, आक्रमक जाणिवेऐवजी सहृदयतेने पहा म्हणजे साहित्याचे मर्म आणि त्यातील माणूसपण अधिक कळेल,' असा प्रेमळ सल्ला ते मला वारंवार देत. सदसद्‌विवेकबुद्धीची लपालपी हा त्यांच्या चिंतनाचा विषय होता. त्या विचारात ते बुडून जात असत.

पत्नी, दोन मुली, जावई, मुलगा, सून आणि नातवंडे या परिवाराला त्यांनी आपल्या प्रेमाने बांधले होते. नातवंडांचे कौतुक सांगताना ते रंगून जात. व्यवसायानिमित्त दूर असलेल्या मुलावरील वत्सलभावाची भरपाई ते आपल्या जावयाचे कोडकौतुक करून करीत. त्याला त्यांनी आपलेसे केले होते. कालच, प्रसाद फडके यांनी त्यांच्यावर केलेली फिल्म (अपूर्ण) पाहिली आणि पुन्हा एकदा त्या भरदार आवाजात गोष्टीवेल्हाळपणे सांगितलेल्या आठवणींच्या जाळ्यात अडकले. ते धीरगंभीर व्यक्तिमत्त्व भोवती वावरत असल्याचा भास झाला. त्यांचे कुटुंबीय, निकटवर्ती आणि त्याच्याही पलीकडे विस्तारलेल्या मित्र, विद्यार्थी, वाचक, चाहते यांच्या परिवाराला आता केवळ त्यांच्या आठवणींत समाधान मानावे लागेल. पारध्याच्या जाळ्यात अडकलेला वारा असतो; पण दिसत नाही, तसे ते आपल्यात असतीलही आणि नसतीलही!

प्राज्ञपाठशाळामंडळाचा आणि प्राचार्य हातकणंगलेकर सरांचा जुना, आत्मीय संबंध होता. प्राज्ञपाठशाळामंडळाच्या परिवाराची व वैयक्तिक रीत्या माझी त्यांना विनम्र श्रद्धांजली.



# वैज्ञानिक दृष्टिकोणातून धर्म

## धर्मातील विचार व आचार यांना जोडणाऱ्या वैज्ञानिक परम प्रक्रिया

राम ताकवले

**(१) प्रस्तावना :**

दक्षिण काशी आणि श्रेष्ठ ज्ञानपीठ म्हणून प्रसिद्ध असलेल्या वाई येथील 'प्राज्ञपाठशाळामंडळाने' दोन दिवसांचा (१०-११ मे २०१४) परिसंवाद आयोजित केला. विषय 'विज्ञान आणि धर्म'. गेल्या तीन-चार दशकांत जे क्रांतिकारक बदल विज्ञान व तंत्रज्ञानात होत आहेत, त्यांचा संबंध धर्म, आचार, विचार व सुधार या प्रक्रियांना कसा लावता येईल, याचा सुसंबद्ध विचार या परिसंवादात मांडावा, असे वाटले. त्यांतूनच ह्या लेखाचा प्रपंच.

डॉ. राजेंद्र प्रभुणे यांनी या लेखाला 'बीज भाषण' म्हणून सादर करावे, असे सांगितले. डॉ. शि. स. अंतरकर यांनी १९७९ साली जी दोन व्याख्याने पुणे विद्यापीठात दिली, त्यांतील धर्मविचार व वैज्ञानिक दृष्टिकोण यावरील विस्तृत विवेचन, आणि अंतिमत: वैज्ञानिक विचार हा धर्मविचाराला पर्यायी नव्हे तर परिपूर्ण करणारा आधुनिक विचार आहे, हा विनोबा भावे आणि जे. कृष्णमूर्तींचा दृष्टिकोण हा माझ्याही लेखाचा आधारभूत विचार राहणार आहे.

डॉ. अंतरकरांच्या व्याख्यानाला आता ३५ वर्षे झाली आहेत. या ३-४ दशकांत जे क्रांतिकारक बदल झाले आहेत, ती परिवर्तनाची प्रक्रिया आजही चालू आहे. हे सर्व सध्याच्या माहितीसंपर्क तंत्रज्ञानाच्या (Information Communication Technology) क्रांतीमुळे होत आहे. आपण एका युगांतराच्या कालखंडातून चाललो आहोत. त्या क्रांतीची सुरुवात 'सूक्ष्म इलेक्ट्रॉनिकी' (Micro-Electronics) च्या तंत्रज्ञानापासून झाली. त्यातूनच प्रक्रिया चिप (Processor Chip) आणि संगणक निर्माण झाले आहेत. जगभर इंटरनेटद्वारे माहिती आदान-प्रदान करण्याचे नेटवर्क तयार झाले आहे. नवीन 'जोडलेला समाज' जागतिक स्तरावर निर्माण झाला आहे. इंटरनेटमुळे संपर्क साधणे, एकत्रित कार्य करणे, संघटन करणे इ. अनेक कार्ये प्रत्येक व्यक्तीस आता करता येऊ लागली आहेत.

या सर्व तंत्रज्ञानाच्या विकासातून नवनव्या प्रक्रिया उदयास आल्या आहेत. त्यांत प्रामुख्याने अंकीकरण (Digitization), आभासीकरण (Virtualization), लोक-व्यक्तीकरण (Mass-personalization) आणि स्वयंसंघटन (Self-organization) या सर्व प्रक्रिया आहेत. त्यांचा वापर करून आता जोडलेला समाज नवनव्या सामाजिक प्रक्रियांना जन्म देत आहे आणि नेटवर्क निर्माण करीत आहे. त्यांतूनच 'मुक्त स्रोतांची' कल्पना निर्माण झाली आणि विकीपेडीया, यूट्यूब, गूगल इ. मुक्त ज्ञान व माहितीस्रोत सर्वांना मिळू लागले. समाजाच्या बौद्धिक प्रक्रिया आज वैश्विक बनल्या असून आभासी बुद्धिमत्तेची (Virtual Intelligence) निर्मिती मोठ्या प्रमाणात होत आहे. माणूस व्यक्ती म्हणून आणि जोडलेल्या वैश्विक समाजाचा एक घटक म्हणून वावरू लागला आहे, विविध कार्ये करू लागला आहे. त्याच्यासाठी एक भ्रामक 'सायबर अवकाश' निर्माण झाले आहे. याचा अर्थ आता माणसाचा व समाजाचा विचार त्यांच्याशी संबंधित तीन अवकाशांमधून करता येणार आहे. ती आहेत – 'सायबर अवकाश' हे बौद्धिक प्रक्रियांसाठी, 'मानस अवकाश' हे भावना, मूल्ये, नीती यांच्या विकासासाठी, तर 'भौतिक अवकाश' हे शारीरिक हालचाल, प्रत्यक्ष निर्मितिप्रक्रिया इत्यादींसाठी. या अवकाशांत माणसाचे व्यक्तिगत व समाजविश्व कसे घडते, घडले पाहिजे किंवा घडावे, यासंबंधीचा आजपर्यंतचा विचार धर्माने केला. या नव्या परिस्थितीत तो कसा करता येईल, याचा विचार या लेखात करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

**(२) धर्म आणि धार्मिक जीवन :**

माणूस हा 'विचार करणारा प्राणी' म्हणून काही लक्ष वर्षांपासून उत्क्रांत होत आहे. ही प्रक्रिया युगानुयुगे

अनुक्रमणिका

चालू आहे. इतर प्राण्यांप्रमाणे जंगलात जगणारा आदिवासी माणूस; शेती-तंत्रज्ञान विकसित करून जगणारा कृषिप्रधान समाजातील शेतकरीमाणूस; गेल्या सहस्रकात विज्ञान व तंत्रज्ञानाचा विकास करून, वेगाने प्रगती करणारा औद्योगिक माणूस (कामगारमाणूस) आणि आता तंत्रज्ञानातील सूक्ष्म-इलेक्ट्रॉनिकीचा (Micro-Electronics) वापर करून तंत्रज्ञानात अंकीय क्रांती (digital revolution) घडवून आणणारा व माहिती-तंत्रज्ञानाने २१ व्या शतकातील सतत जोडलेल्या समाजाचे नवे प्रारूप निर्माण करणारा 'माहिती-तंत्रज्ञान' युगातील – ज्ञानयुगातील – नवा "ज्ञानी माणूस" ही माणसाची चारही रूपे गेल्या ५०-१०० हजार वर्षांत उत्क्रांत झाली आहेत. त्यांची कालांत विभागणी केल्यास सर्वसाधारणतः आदिवासी ५०-१०० हजार वर्षे, शेतकरी - १० हजार वर्षे, औद्योगिक- कामगार माणूस १००० वर्षे. या गतीने २१ वे शतक (१०० वर्षे) हे माहिती तंत्रज्ञानावर आधारलेल्या ज्ञानी समाजाची (Knowledge Society) निर्मिती होण्याचा कालखंड आहे.

युगायुगांतून अवतरणारा, युगांतराचा सध्याचा कालखंड असून, आपण व पुढच्या २-३ पिढ्या या युगप्रवर्तनात महत्त्वाचे घटक ठरणार आहोत.

**धर्मविचार :**

माणसाचा विचार गेल्या तीन ते पाच हजार वर्षांच्या काळापासून आपणास ज्ञात आहे. भारतीय धर्मविचार हा प्राणिमात्राचा व विश्वाचा समग्रपणे व एकात्मिक पद्धतीने विचार करतो. माणूस हा विश्वाचा एक घटक असून, विश्वात शांतीने व सुरक्षित जीवन जगता यावे ही माणसाची सातत्याची धडपड आहे. म्हणूनच भारतीय धर्मविचार व्यष्टी, समष्टी, सृष्टी आणि परमेष्टी यांचा एकत्रित विचार करतो. तो समग्र ब्रह्मांडाचा, विश्वाचा विचार आहे. म्हणूनच व्यक्तीच्या मनाची, विचाराची आणि समाजाच्या संघटनेची सातत्याने धारणा करणारा तो धर्म आहे. (धारयति इति धर्मः)

समाजाची जडणघडण करण्यासाठी व्यक्तीचे विचार, आचार व सुधार यांवर धर्म भर देतो. व्यक्ती व तिची संघटना ही कुटुंब, परिवार आणि त्यांनी घडलेले गट-संघ यांवर अवलंबून आहे. त्यांच्या सुरक्षिततेचा, शांतीचा व सुखाचा विचार करण्यासाठी नेतृत्व लागते. भारतीय धर्माने ते नेतृत्व विभागले आहे व त्यांतूनच 'ज्ञान व धर्मातील नेतृत्व', 'सुरक्षा व शासनातील नेतृत्व' आणि 'उद्योग व व्यवसायाचे नेतृत्व' अशा तीन 'सत्ताकेंद्रांत' त्यांची विभागणी केली आहे. ही एका दृष्टीने ज्ञान (बुद्धी), शक्ती (बाहुबल) आणि कार्य (उद्योग) यांमध्ये केलेली मानवी समाजजीवनाची विभागणी आहे. त्या त्या क्षेत्रातील श्रेष्ठ व्यक्तींकडे त्या क्षेत्राचे नेतृत्व दिलेले आहे. सुरुवातीस ते कार्यकौशल्यावर अवलंबून होते. नंतरच्या कालखंडात गुणश्रेष्ठत्व जाऊन ते जन्मजात श्रेष्ठत्वात रूपांतरित झाले. धर्माने त्यांचे नियमन आणि परस्परसंबंध नियमित व नियंत्रित करण्याचा प्रयत्न केला. त्यातूनच धर्मासंबंधी तत्त्वज्ञान निर्माण झाले असावे.

धर्माने व्यक्तीच्या जगण्यास व कृतीस अर्थ लाभावा, व त्याला त्याचे वैयक्तिक आणि सामाजिक जीवन सोपे व्हावे म्हणून धर्माचे शिक्षण देणाऱ्या आचार्यांनी अनेक प्रारूपे आणि कथा निर्माण केल्या. अगदी उपनिषदापासून त्यांनी आत्मा/मन हा शरीरापासून भिन्न मानला. शरीर नश्वर किंवा मर्त्य असले तरी आत्मा अमर आहे, असे मानले. वृद्धत्वावर आणि मृत्यूवर मात करण्यासाठी हे गृहीतक फारच उपयोगी पडते. त्यांतूनच स्वर्ग, नरक आणि त्या विश्वांचा नियंता देव व वाईट प्रवृत्तीचे दानव यांची उत्पत्ती झाली. त्यामुळे व्यक्तीचे व समाजाच्या कृतींचे चांगले म्हणजे धार्मिक जीवन जगणे व चांगल्या कृतींचा किंवा पुण्याचा संचय करून पारलौकिकात चांगले स्थान प्राप्त करणे ही संकल्पना समाजात रुजली. हा पारलौकिकाचा किंवा अध्यात्माचा आधार सर्वसामान्यांना देण्यात आला. बुद्धिमंतांना मात्र 'तत् त्वं असि' सांगून तूच देवस्वरूप असून व्यक्तीचा जीवनातील प्रवास हा दैवत्व जपणे-वाढवणे म्हणजे चांगले वागणे आणि दानवत्वापासून म्हणजे वाइटापासून दूर राहणे असा एक अर्थ इहवादी विचारांसाठी दिला.

व्यक्ती ही फक्त आत्म किंवा स्वकेंद्री राहू नये व तिची सामाजिकता वाढवण्यासाठी 'निष्काम कर्मयोगा'चे तत्त्वज्ञान धर्माने पुढे मांडले. व्यक्ती व समाज यांच्या परस्परहितसंबंधाचे जे द्वैत तयार होते, स्वार्थ की परमार्थ यांतील जो संघर्ष होतो, त्यातून अद्वैत शोधण्याचा धर्माने








प्रयत्न केला. विचार करणाऱ्या आणि कृतिशील जीवन जगणाऱ्या अशा ज्ञानी व 'अज्ञानी' समाजासाठी संहिता ठरवून दिली गेली व सर्वांनी धर्माचरण करून जीवन भयमुक्त, प्रेममय व समाधानाने जगावे, हा एक अध्यात्माचा मार्ग धर्माने सर्वांना दिला.

ज्यांना धर्माचे ज्ञान चांगले आहे, त्यांना एक परिवर्तनाचा व प्रगतीचा मार्गही धर्माने घालून दिला आहे. तो अध्यात्माच्या मार्गाने 'परमात्म्याचा' व परम मार्गाचा विचार करतो. तो प्रवृत्तींचा त्याग करून 'निवृत्ती'च्या मार्गाने जाऊन अध्यात्मातील वरच्या पायरीवर जाण्याची धडपड करतो. महाभारतात सर्वजण धारातीर्थी पतन पावले; फक्त पाच पांडव व द्रौपदी जिवंत राहिली. जे युद्धात मेले ते स्वर्गात गेले. राहिलेल्यांना पारलौकिक मार्गाने पुढे जावे लागले. त्यांची वाटचाल कोणाची कोठपर्यंत व का झाली, याचे वर्णन महाभारतात शेवटी आहे. ह्या सर्व कथा आहेत. मानवनिर्मित आहेत. परंतु जीवन का व कसे जगवयाचे, याचा मार्ग सांगण्याचा प्रयत्न या कथा करतात. या दृष्टीने धर्माने जीवनातील परिवर्तन व प्रगती यांचे मार्ग सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. जीवनाचे चार टप्पे पाडलेले आहेत. ब्रह्मचर्य (ज्ञानार्जन), गृहस्थी (कर्मशीलता), वानप्रस्थाश्रम (निवृत्ति मार्ग) आणि संन्यास (लौकिक विश्वाचा त्याग) या चार कालखंडांतून मानवी जीवन पूर्णत्वास जाते. जीवन पूर्णत्वाने जगण्याची ही एक धर्मकल्पना आहे.

धर्माने जीवन जगण्याचे एक तत्त्वज्ञान व पारलौकिक विश्व माणसाच्या भौतिक जीवनास जोडलेले आहे. धर्मकल्पना ही परिपूर्ण असून ती अपरिवर्तनीय आहे. कारण तिला भगवंताचे – परमेश्वराचे – अधिष्ठान आहे, हा विचार सर्वसामान्यांच्या मनात घट्ट आहे. या तत्त्वज्ञानाबरोबरच धर्माने एक मूल्यव्यवस्था, नीतिमत्ता व संस्कृतीवर आधारित अनेक आचारविचार निर्माण केलेले आहेत.

आता २१ व्या शतकातील विज्ञान, विशेषतः समाजविज्ञान व तंत्रज्ञान यांचा जो समन्वय घालण्याचा आज प्रयत्न चालू आहे, त्याचाच विचार या पुढच्या भागात आपण करणार आहोत.

**(३) २१ व्या शतकातील वैज्ञानिक दृष्टिकोण नव्या प्रक्रिया- नवे संघटन :**

एकविसाव्या शतकातील वैज्ञानिक प्रगती तंत्र-वैज्ञानिक व तंत्र-सामाजिक या दोन अंगांनी होत आहे. विज्ञानातून निर्माण झालेल्या सूक्ष्म-इलेक्ट्रॉनिकीच्या तंत्राचा वापर संपर्क-माध्यमांचे तंत्रज्ञान (Information Communication Technology) म्हणून विकसित होत आहे. त्यामध्ये आजपर्यंत अज्ञात अशा नव्या प्रक्रिया व मार्ग शोधले गेले आहेत. त्यामध्ये वर उल्लेख केलेल्या अंकीकरण, आभासीकरण, लोकव्यक्तीकरण आणि स्वयंसंघटन या प्रक्रिया आहेत. काळ आणि अवकाश यांना जोडणारे एक सायबर अवकाश त्या प्रक्रिया निर्माण करतात. हे अवकाश आज प्रत्येकास उपलब्ध असून त्या भ्रामक अवकाशात माणूस विविध अवतार घेऊन विश्वसंचार करू शकतो. हे अवकाश आभासी असले तरी त्याचा व्यक्तीशी प्रत्यक्ष भौतिक संबंध आहे. सायबर अस्तित्व भौतिक अस्तित्वाशी निगडित असल्यामुळे या अवतारातील कार्ये व प्रवास यांच्या पाऊलखुणा सापडू शकतात. विज्ञानाने व नवतंत्रज्ञानाने माणसास वैश्विक जीवन दिले असून त्याचे अशारीरिक परंतु ज्ञानमय (Cognitive) व्यक्तित्व विश्वसंचार करू शकते. व्यक्तीचे ज्ञान-विश्व आणि तिचे मानस-विश्व ही सतत एकत्रितच असतात. ज्ञान आणि मन यांचे वैश्विक अस्तित्व शरीराने जरी मर्यादित केले असले, तरी माणसाचा सायबर अवकाशातील विश्वसंचार ही आधुनिक तंत्रज्ञानाची उपलब्धी आहे.

मानवाची तंत्र-सामाजिक प्रगती ही त्या तंत्रज्ञानाचा व सायबर अवकाशाचा विविध सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक प्रक्रियांसाठी किती व कसा उपयोग केला जातो, यावर अवलंबून आहे. त्यांच्या दोन उपयोगांची (apps) उदाहरणे येथे देता येतील. एक मुक्तस्रोतांची चळवळ व दुसरी विविध कारणांसाठी निर्माण होणारे सामाजिक नेटवर्क. जोडलेल्या समाजातील अनेकांनी आपले ज्ञान व अनुभव आज विकीपेडीया, गुगल, यूट्यूब, एम्आयटीचे मुक्त पाठ्यक्रम, इटीडी इ. च्या संकेत स्थळांवर उपलब्ध केले आहेत. ते व या स्थळांवरील जगप्रसिद्ध व्यक्तींची अत्याधुनिक प्रगती किंवा विचार

सांगणारी व्याख्याने आदी अनेक अनंत ज्ञानस्रोत आज उपलब्ध आहेत. ते अभ्यासून आता प्रत्येक विद्यार्थ्यांस त्याच्यापुढे प्रगती करता येईल. मुक्त ज्ञानस्रोतामुळे हळूहळू ज्ञानाचे सार्वत्रीकरण होत असून, जागतिक समाजाने निर्माण केलेली समाज संपत्ती (Social Wealth) म्हणून भविष्यात त्या ज्ञानस्रोताचा मोफत वापर व्यक्ती करू शकते. वैश्विक समाजाने एकत्रित केलेली ही ज्ञानसंपत्ती सर्वांसाठी मोफत उपलब्ध करून देऊन २१ व्या शतकातील समाजाने दाखवलेले आपले दातृत्व आणि विश्वस्तवृत्ती हे नव्या युगाचे एक वैशिष्ट्य राहील.

सामाजिक संपत्तिनिर्मितीसाठी तंत्रज्ञानाने एक नवी प्रक्रिया आणि समाजसहभागाची पद्धती (Collaboration) निर्माण केली आहे. विकीपेडीया निर्माण करताना ही पद्धती विकसित झाली. जगभरातील सर्व व्यक्ती किंवा संस्था ही समान समाजसंपत्ती निर्माण करू शकतात. ही विकी-प्रक्रिया सहकारी (Cooperative) म्हणजे गटाने एकच काम विभागून पण एकत्रितपणे पार पाडणे, या नेहमीच्या प्रक्रियेला पूरक आहे. तीमध्ये विकी संघटनेची (स्वयंसंघटनेची) एक पद्धती निर्माण होत आहे. सर्व समाजाने वैश्विक उपयुक्ततेचे कार्य एकत्रितपणे स्वीकारणे, त्यामध्ये प्रत्येकाने आपला सहभाग देणे व सर्वांनी मिळून ही समाजसंपत्ती वापरणे, वृद्धिंगत करणे व मानवाचे व विकासाचे प्रश्न सर्व समाजाने एकत्रितपणे सोडवणे, अशी ही पद्धत आहे. औद्योगिक समाजापेक्षा जोडलेल्या समाजाची मूल्ये आणि नीतिमत्ता ही पूर्णपणे अलग पायावर उभी राहणार आहेत.

**वैज्ञानिक दृष्टिकोण :**

माणसाने विचार करण्यास व त्यास अनुसरून कृती करण्यास सुरुवात केल्यानंतर, प्रथम उपयोगाची उपकरणे निर्माण केली. गेल्या १० हजार वर्षांत जंगलात राहणाऱ्या आदिवासीपासून शेती करणारा शेतकरी म्हणून त्याचा विकास झाला. या कालखंडात ज्ञान-विज्ञान आणि धर्म एकत्रितच वाढते. गेल्या सहस्रकात मानवाचे निसर्गविषयक ज्ञान वाढत गेले. यासाठी मानवाने तर्कशास्त्र, गणितशास्त्र आणि सत्यशोधनाची शास्त्रीय पद्धती निर्माण केली. या पद्धतीचा आणि निसर्गनियमांचा वापर करून मानवाने नवनवीन तंत्रज्ञान निर्माण केले. स्वयंचलित यंत्र-मशीन-तयार केले. कृत्रिम बुद्धिमत्ता आता विकसित केली जात असून, आता फक्त व्यक्तिगत प्रज्ञेचा वापर न करता, समाजाच्या विकसित प्रज्ञेचा आणि ज्ञानाचा वापर करून, आज अनेक सामाजिक व नैसर्गिक प्रश्न सोडवण्याचे व सर्वांना उपयुक्त अशी साधने, उपकरणे किंवा ज्ञान-संपत्तिस्रोत निर्माण करण्याचे मार्ग विकसित केले जात आहेत (Crowd Sourcing किंवा Social Sourcing). मानवाच्या वैश्विकतेकडे जाण्याच्या वाटचालीसाठी हे नवे मार्ग निर्माण होत आहेत.

**शास्त्रीय पद्धती :**

विश्वातील जीवित आणि निर्जीव वस्तूंची, जीवांची निर्मिती, जन्म, जीवन आणि क्षय किंवा मृत्यू कसा होतो हे शोधण्यासाठी विज्ञानाने एका शास्त्रीय पद्धतीचा विकास केलेला आहे. त्यामध्ये खालील मूलतत्त्वांचा समावेश आहे-

.* प्रत्यक्ष घटना आणि निष्कर्ष यांतील संबंध तर्कशास्त्र किंवा गणितीय पद्धतीने शोधता येतात.

.* वैज्ञानिक उपपत्ती ही कार्यकारणसंबंधावर (Cause-effect relation) अवलंबून असते. कारण (cause) असल्याशिवाय कार्य घडत नाही.

.* जे आपण 'पाहू' शकतो किंवा करू शकतो ते कोणासही, कोठेही व केव्हाही करता येते. त्यास लागणारी परिस्थिती निर्माण करणे गरजेचे असते.

.* विज्ञान व्यक्ती किंवा ग्रंथप्रामाण्यवादी नाही. ते प्रत्येकास समजते व साध्य होते.

.* शोध लावताना वस्तुनिष्ठता आणि तटस्थता पाळावी. तरच ते शोध व निष्कर्ष वैश्विक ठरतात.

विज्ञानाचा उद्देश अंतिम सत्याचा शोध घेणे असून, सर्व सिद्धान्त किंवा फलित हे परिवर्तनीय आहेत. त्यांची सिद्धता विशिष्ट व्याप्तीपुरती असते. ती व्याप्ती वाढवून तत्त्वे, नियम किंवा सिद्धान्त परिपूर्ण करता येतात, नवीन शोधता येतात किंवा परिवर्तन घडवता येते. विज्ञान अंतिम सत्य शोधल्याचा दावा कधीच करीत नाही. त्याच्याही पलीकडे काही आहे, ते शोधण्याचे आव्हान विज्ञान मानवास देते.

या बाबतीत धर्म निराळा दृष्टिकोण स्वीकारतात. धर्म अपरिवर्तनीय मानले जातात. (महर्षी व्यासांनी जे









सांगितले, ते परिपूर्ण विश्व आहे इ.)

विज्ञानाची सुरुवात निसर्गाचे नियम, प्रक्रिया व फल समजून घेण्यापासून झाली. त्याच प्रक्रिया प्रयोगशाळेत किंवा ठरावीक क्षेत्रांवर करून त्यापासून ज्ञाननिर्मितीचे कार्य सुरू झाले. त्या प्रयोगांत निवेश आणि प्रक्रियांमध्ये बदल करून नवनवीन वस्तू (फल) किंवा सेवा निर्माण करता येऊ लागल्या. तंत्रज्ञानाचा व मशीनचा/उपकरणाचा वापर मोठ्या प्रमाणात करून वस्तू-उत्पादनात गती, दर्जा, उत्पादकता अधिकाधिक वाढवता आली. २१ व्या शतकात त्याच अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करून छोट्या प्रयोगशाळा, कार्यशाळांमध्ये संगणकाचा वापर करून विकेंद्रित पद्धतीने वस्तू आणि सेवानिर्मितीचे कार्य करता येईल, अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. ज्ञानाच्या सार्वत्रिकतेनंतर आता यंत्रांचे लघुकरण सुरू झाले असून मोठमोठ्या कारखान्यांतून विपुल उत्पादन करणाऱ्या कारखानदारीला, घरगुती निर्मितिकेंद्रांचा (Cottage Industry) भविष्यात पर्याय उभा राहणार आहे. तो कसा, केव्हा स्वीकारला जाईल किंवा नाही, याचा विचार पुढच्या पिढीला उद्योग-व्यवसायासाठी आवश्यक ठरणार आहे.

**निसर्गातील आणि समाजातील शक्ती आणि ऊर्जा (Force and Energy) :**

भौतिक शास्त्राने निसर्गातील चार शक्तींचा (forces) शोध लावला असून त्यांच्या आधारे विश्वातील वस्तू व शक्तींचे नियंत्रण किंवा ऊर्जेत परिवर्तन होते. त्या शक्ती आहेत : गुरुत्वाकर्षण, विद्युत्-चुंबकीय बल, तीव्रबल (strong force) आणि क्षीणबल (weak force). अणुरेणूपासून ते विशाल विश्वाचे नियमन याच शक्तींच्या मुळे होते. त्यांच्यामुळे ऊर्जा एका रूपातून अन्य स्वरूपात बदलते व त्याच शक्तींच्या व ऊर्जेच्या नियमनाचा वापर मानवाने यंत्रे व तंत्रज्ञान निर्माण करण्यात केला आहे.

भौतिक शास्त्रांच्या विकासाबरोबरच जैवशास्त्र व सामाजिक शास्त्रांचा विकासही गेल्या काही शतकांत झालेला आहे.

औद्योगिक युगानंतर व आता आपण औद्योगिक क्रांतीमधून तयार झालेल्या समाजानंतरच्या ज्ञानमय समाजात व व्यवस्थेत उत्क्रांत होत आहोत.

समाजशास्त्रज्ञांनी प्रस्तावित केलेली औद्योगिक समाजासाठीची आणि संघटनेची नवी तत्त्वे व मूल्ये ही वैश्विक आहेत. त्यांत प्रामुख्याने लोकशाही, समाजवाद किंवा समाजसत्तावाद– यालाच म. गांधी स्वराज्य पर्याय म्हणून देतात– आणि धर्मनिरपेक्षता ही तत्त्वे आली. याच कालखंडात प्रगती व आधुनिकता या संकल्पना विकसित झाल्या. या सर्व मूल्यांचा व संघटनातत्त्वांचा उल्लेख भारतीय राज्यघटनेच्या प्रस्तावनेत आलेला आहे. त्यांतील स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या तत्त्वांचा आणि मूल्यांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे.

धर्माने जो वैश्विकतेचा आणि अध्यात्माचा मार्ग दाखवला, तोच तत्त्वांचा व नीतीचा मार्ग विज्ञान व समाज-विज्ञानांतून आपणास लाभत आहे. तंत्रज्ञानामुळे व विविध आधुनिक उपकरणांच्या उपयोजनामुळे धर्मामधील आध्यात्मिक तत्त्वज्ञान व व्यावहारिक जीवन यांमधील दरी संकुचित होत आहे.

निसर्गातील शक्ती आणि ऊर्जेप्रमाणेच सामाजिक शक्ती आणि सामाजिक ऊर्जा आता वैश्विक व स्थानिक पातळीवर एकत्रित करणे सतत जोडलेल्या समाजामुळे शक्य होत आहे.

साधारणतः लोक आपणास दोन स्वरूपांत दिसतात – संघटित किंवा गर्दी-घोळक्याने. संघटित समाजाची (Community/समाज) आणि गर्दीची बुद्धिमत्ता, कर्तबगारी व कौशल्यांचा जर एकजुटीने निश्चित कार्यासाठी उपयोग केला, तर तो समाज व राष्ट्र वेगाने प्रगती करते. या संघटनेचा वापर औद्योगिक व संरक्षक कारणासाठी गेल्या दोन शतकांत अनेक देशांनी आणि हुकूमशहांनी केला आहे. त्या संघटना राजसत्तेत व अर्थसत्तेत एकवटलेल्या होत्या व त्यांची संघटनेची व नियंत्रणाची सूत्रे शासन व देश-केंद्री होती. परंतु सतत जोडलेल्या समाजात, सर्वसामान्यांचे जर तंत्रज्ञान, ज्ञान व शिक्षणामुळे सार्वजनिक सबलीकरण झाले, तर फार मोठी समाज-शक्ती उभी करता येते. ही संघटित आणि असंघटित समाजशक्ती किंवा गर्दीचे ज्ञान वापरून नवीन समाजकेंद्री व्यवस्था निर्माण करणे शक्य होणार आहे. जोडलेल्या समाजात खालच्या स्तरामध्ये प्रचंड शक्ती आहे. त्यातूनच व्यक्तिगत नावीन्यतेच्या व नवनिर्मितीच्या संकल्पना व

शक्ती निर्माण करणे हे समाजधारणेचे व प्रगतीचे नव्या युगातील मार्ग आहेत.

**(४) धर्म आणि विज्ञानाचा समन्वय :**

विज्ञान व धर्मातील काही मूलभूत व महत्त्वाच्या विचारांचा, तत्त्वांचा आणि संकल्पनांचा-सिद्धान्तांचा आपण विचार केला. त्यांच्यातील समन्वय पाहणे आणि विज्ञान हाच २१ व्या शतकाचा धर्म असू शकतो आणि आहे, या दृष्टीने त्याचा विचार करू या. हा विचार करताना आपण शिक्षण ह्या समाजशास्त्रीय विषयाचा आधार घेऊ या. शिक्षण ही समाजास घडवण्यासाठी लागणारी एक समाजव्यवस्था असून ती समाजाच्या व्यापक व्यवस्थेचे एक उपांग आहे. व्यक्ती व समाजपरिवर्तनाचे ते एकं मूलभूत साधन आहे, या दृष्टीने त्याचा विचार करू या.

**विश्वव्यापी विचार – ब्रह्मज्ञान :**

भारतीय धर्माने व्यक्ती आणि समाज यांचा विचार विश्वाच्या चराचर सृष्टीचा एक भाग म्हणून केला व आचाराचे विधी आणि कृती सांगितल्या. अध्यात्माचा विचार हा त्या आचार-विचारांच्या प्रक्रियांचा विचार आहे. हा विचार अमूर्त असून तो बौद्धिक आहे व त्यातूनच ज्ञाननिर्मिती आणि विज्ञान निर्माण होते आणि जीवनास मार्ग आणि अर्थ प्राप्त होतो. जगण्याचे प्रयोजन व उद्देश समजतात. धर्माने जगण्याचे बुद्धिवादी, कर्मशील किंवा सेवाभावी (ज्ञान, भक्ती व शक्तीची उपासना) मार्ग सुचवले आहेत. अंतिमतः माणूस हा विश्वमानव व्हावा, तो विश्वसमाजात एका कुटुंबाप्रमाणे रहावा व त्याचे आणि निसर्गाचे– जीवन व सृष्टी यांचे– अतूट, परस्परपूरक संबंध असावेत, ते चिरस्थायी व शाश्वत रहावेत, हा धर्मातील आध्यात्मिक विचार. त्यासाठी व्यक्ती व समाजाचे धर्माने नियमन करता यावे म्हणून देव, दानव, स्वर्ग-नरक, आत्म्याचे अमरत्व, चांगल्या-वाइटाचा विचार हा आत्म्याच्या विकासाचा आणि सद्गतीचा विचार असून अनेक कोटी जन्मांतून तो सृष्टीमधील विविध रूपे धारण करतो व अंतिमतः माणूस आणि देवाच्या स्वरूपात चिरजीवन जगतो. हे धर्माने निर्माण केलेले प्रारूप एक कल्पनाचित्र असून ते अपरिवर्तनीय आहे, ही धर्माची भूमिका राहिली आहे. त्यातील विविध विचारांचा व दृष्टिकोणांचा विचार आपण टाळू या आणि पुढे विचार करू या.

नव्या आधुनिक विज्ञानाने मानवाला ज्ञानात्मक, मानसात्मक व भौतिक कृतींसाठी असे तीन अवकाश निर्माण केलेले आहेत. त्यांत तो संचार करू शकतो. परंतु तो शरीरापासून अलग होऊ शकत नाही. शरीर मृत होते तेव्हा विचार व कल्पनाही थांबतात. आज माणूस व समाज सायबर विश्वाचा वापर करून वैश्विक बनतो, मानसविश्वाचा विकास करून सुसंस्कारित होतो, मूल्यधारणा करतो आणि योग्यासारखे मनाचे नियंत्रण करून स्वतःचे विचार व शारीरिक कृती यांच्याशी चांगले संबंध जुळवून शांतीने व सुखाने जगू शकतो. विज्ञानाचा उद्देश माणूस, समाज, निसर्ग आणि विश्व यांच्यातील परस्परसंबंध, कार्यपद्धती शोधणे व सर्वांचे नियमन व नियंत्रण करणाऱ्या वैश्विक तत्त्वांचा, शक्तींचा आणि ऊर्जेचा शोध घेणे हा आहे. मानवाने आज भौतिक, निर्जीव सृष्टीचे जवळजवळ परिपूर्ण ज्ञान मिळवलेले आहे. आता जैविक व सामाजिक जीवनाची तत्त्वे व कार्ये शोधण्याचा कालखंड चालू आहे. येथे अंतिम सत्याचा शोध हा विज्ञानाचा उद्देश आहे. व्यक्ती, समाज व निसर्ग यांचे जीवन व कार्य यांचे नियमन करणारे विज्ञान शोधणे हे आव्हान व पुरुषार्थ आहे व त्याच्यासाठी सुयोग्य आणि समाज आणि निसर्गास उपयुक्त असे, लोकतंत्रज्ञान व उपकरणे निर्माण करणे हे कार्य आहे. इथे सत्य हाच परमेश्वर; व्यक्ती, समाज व सृष्टी यांचे कार्य नियमित करणारे व परिवर्तनाचे मार्ग दाखवणारे हे ज्ञान, व ते ज्ञान आत्मसात करून स्वतःचा, समाजाचा विकास साधणे व जीवनासाठी ऊर्जा निर्माण करण्यासाठी योग्य त्या संपत्तीची निर्मिती करणे हे जीवनातील निर्माण-कार्य. हे सर्व जाणणे व त्याप्रमाणे बदल व परिवर्तन सतत घडवणे, आपला व्यक्तिगत व समाजाचा जीवनमार्ग आखणे, जीवनप्रवास करणे व सुखाने आणि समाधानाने जीवन जगणे हे ज्ञान व कृती शिकवणारे शिक्षण. असे योग व सहयोगाच्या विद्यांच्या अंगाने विकसित करणारे व उद्योगाने जीवन समृद्ध करणारे ते शिक्षण. ही

शिक्षणाची व्यापक संकल्पना आहे.

**व्यक्ती, समाज व जीवनमार्ग :**

समाजात, सृष्टीत आणि विश्वात संचार करताना व्यक्तीने कसे वागावे, स्वतःच्या व समाजाच्या कृतींना कोणती दिशा द्यावी व त्यांची कारणे काय असावीत, याचे नियमन करण्याचा धर्माने प्रयत्न केला. एक विशिष्ट मानसिकता, विचारपद्धती व कृतिशीलता धर्माने जोपासली. धार्मिक आचरण शिकवले. ती जागा आता विज्ञानास घ्यावयाची झाल्यास, त्यास स्व आणि समाजनियंत्रणाचे काम व तेही व्यक्तिगत, गटाच्या, समूहाच्या व संस्थांच्या पातळीवर करावे लागेल. अनेक धर्मकल्पनांना आधुनिक व प्रगतिशील युगाचे विचार व आचार यांच्यात परिवर्तित करावे लागते. ते व्यक्तीस, गटांस व समाजास शिकवावे, शिकावे लागेल. एकूणच ही जबाबदारी शिक्षकांची व शिक्षण संस्थांची असणार आहे. शिक्षणाने भावी समाज व भविष्य घडवणे, हे समाजविकासाचे व परिवर्तनाचे कार्य शिक्षणपद्धतीस करावे लागणार आहे.

म. गांधी सत्याला परमेश्वर मानीत. विज्ञानाचा उद्देशही तोच आहे. सत्य शोधणे हे प्रत्येक व्यक्तीचे व शिक्षित समाजाचे कार्य असले पाहिजे.

हे शिक्षणाचे किंवा घडविण्याचे कार्य युगानुयुगे चालू आहे. गेल्या १५-२० हजार वर्षांत जी तीन युग-प्रवर्तने झाली, त्यांत मानवाने विज्ञानात व तंत्रज्ञानात सतत प्रगती केली आहे. त्या त्या युगात शिक्षणपद्धतीतील कार्यकौशल्ये त्या त्या युगातील तंत्रज्ञानावर व उपकरणांवर अवलंबून राहिलेली आहेत. निसर्गज्ञान, कृषिज्ञान, यंत्रज्ञान व आता संगणकाचे बुद्धीच्या, माहितीविश्लेषण-संश्लेषणाच्या प्रक्रिया अधिकाधिक वेगाने करणारे ज्ञान नैसर्गिक व यंत्राची बुद्धिमत्ता (कृत्रिम बुद्धिमत्ता) वापरून मानवाला विकासाच्या 'पुढच्या' टप्प्यावर नेत आहे. व्यक्ती व समाजाची रचना, गरजा, पुरुषार्थाचे मार्ग, यशस्वी जीवन जगण्याचे आणि मोठे उन्नत होण्याचे मार्गही युग व काळाप्रमाणे बदलत गेलेले आहेत. प्राथमिक किंवा मूलभूत गरजा बदलत गेल्या आहेत. व्यक्ती व गट/कुटुंब म्हणून जगण्याचे ज्ञान व अत्यावश्यक तंत्रज्ञान व उपकरणे बदललेली आहेत. म्हणूनच 'गरिबी'ची संकल्पनाही समाजातील प्रत्येकास विकास पावण्यासाठीची आवश्यक साधने व सबलीकरणाचे तंत्र व मार्ग यांचा समावेश करून विस्तारित करावी लागेल आणि जगण्यास व प्रगतीस आवश्यक अशी ठरवावी लागेल.

२१ व्या शतकातील जोडलेल्या वैश्विक समाजाच्या गरजा ह्या फक्त अन्न, वस्त्र आणि निवारा ह्या नसून, त्यांत शिक्षण व आरोग्यसुविधा, प्रगतीस व सबलीकरणासाठी आवश्यक ती नेटवर्क आणि त्यांस जोडणाऱ्या उपकरणांची सुविधा, आणि लोकशाही, समाजवादी (स्वराज्यपद्धतीने) आणि जातिनिरपेक्ष (Secular) समाजजीवन समर्थपणे जगण्यासाठी समाजसंघटनेचे स्वातंत्र्य व अधिकार यांचा समावेश करण्याची आवश्यकता आहे. सतत जोडलेला व ज्ञान-तंत्रज्ञानाने व नेटवर्कने सबल झालेला समाज निर्माण करणे हे विज्ञानाचे व शिक्षणाचे उद्दिष्ट असले पाहिजे.

जोडलेल्या नव्या समाजाचे नवे शिक्षण हे व्यक्ती व समाजाचा एकत्रित विचार करून व्यक्तीची व गटाची पात्रता वाढवणारे (capacity, capability and co-creativity) वैश्विक समाजाचा भाग बनून सहनिर्मितीच्या प्रक्रियेमध्ये सहभाग घेणारे आणि निर्मितिकार्य करणारे असावे. ते कार्य परिपूर्ण कार्य (wholesome work) असावे, ते समाजास उपयुक्त व उत्पादकता वाढवणारे (Socially useful and productive work) असावे. त्यातून व्यक्ती किंवा गट/समूहाच्या संपत्तिनिर्मितीच्या कार्याबरोबरच सामाजिक संपत्ती निर्माण करण्याचा उद्देश असावा. त्यातूनच समाजाच्या सहजीवनाचा आणि सहनिर्मितीचा मार्ग सापडला पाहिजे. प्रत्येक व्यक्तीस आपला शिकण्याचा ज्ञानमार्ग व कर्मशीलतेचा, विकासाचा आणि व्यवसायाचा-उद्योगाचा मार्ग सापडावयास हवा. हा मार्ग नवशिक्षणाप्रमाणे खालील साखळीत सापडतो.

**शिकणे - विकास पावणे/निर्मिती करणे - व्यक्ती व सामाजिक मूल्य/संपत्ती निर्माण करणे - व्यक्ती आणि समाजपरिवर्तन करणे.**

परिवर्तनाचा हा मार्ग शोषण व विध्वंसनाच्या मार्गाने न जाता तो नवसंस्कृतीच्या आणि नवनिर्मितीच्या मार्गाने गेला पाहिजे. नवशिक्षणाचा हा मार्ग निसर्ग आणि समाजविज्ञानावर आणि मानवी मूल्यांवर अवलंबून असला

पाहिजे आणि त्यातून मानवी विकास आध्यात्मिक स्तरावरील प्रगती, संस्कृती, मूल्यवृद्धी आणि नवनिर्मितीच्या मार्गाने जावयास हवा. शोषणरहित, शाश्वत (Sustainable) आणि चिरस्थायी (Permanent) तरीही सतत परिवर्तनीय समाजाची निर्मिती करणे हे मानवाचे व वैज्ञानिक धर्मांचे कार्य आहे. हे का व कसे, यांचे शास्त्रीय उत्तर विज्ञानाने दिले पाहिजे; व्यक्तीने शोधले पाहिजे. एका अर्थाने नवे शिक्षण हे वैज्ञानिक धर्माच्या विकासाचा पाया ठरले पाहिजे.

**समाजसंघटना व सत्ता :**

सत्ता व समाज यांमध्ये सातत्याचे द्वंद्व आहे, द्वैत (dialectics) आहे. त्यांतून मध्ययुगीन कालापासून राजसत्ता, धनसत्ता व धर्म/ज्ञानसत्ता ही वरून खाली संघटित केली गेली आहे. एक सत्ताधारी वरचा वर्ग व सामान्यांचा खालचा वर्ग अशी ही वर्गवारी पूर्वीपासूनच चालत आली आहे. २१ व्या शतकात सतत जोडलेल्या आणि ज्ञान व तंत्रज्ञानाने सबल झालेल्या लोकशाही समाजास मागील दोन युगांतील समीकरणे तशीच लागू पडणार नाहीत. आता जो नवा ज्ञानवान समाज आहे, तो पूर्वीसारखा सरंजामशाही पद्धतीने संघटित करणे कठीण जाणार आहे. तसेच खालून वर सत्तेचे संघटन आणि विकेंद्रीकरण कसे करता येईल, याचा विचार करण्याची गरज लोकशाही व समाजवादी समाजास पडणार आहे.

नव्या शिक्षणात ज्ञानार्जनासाठी आणि विकासासाठी सहकाराने व सहभागाने छोट्यामोठ्या गटांनी शिकावे व संघटित निर्मिती करावी, ही पद्धती आहे. ते गट व समूह स्थानिक असू शकतात किंवा संमिश्र वैश्विक-स्थानिक असू शकतात. सायबर अवकाशाचा त्यासाठी मुक्तपणे वापर करता येईल. निर्मितिक्षम आणि सुसंघटित समाज ही कोणत्याही समाजाची शक्ती असल्यामुळे त्याचे नियंत्रण स्वराज्याने आणि स्व-शासनाने करणे शक्य आहे. फार काय, संपूर्ण समाज एक शिकणारा व विकास पावणारा समाज म्हणून वृद्धिंगत झाला पाहिजे. त्याच्या निर्मितीचे नियंत्रण त्या त्या समाजगटाकडे असले पाहिजे.

सध्याच्या अर्थसत्तेचे व राज्यसत्तेचे केंद्रीय नियंत्रण चांगलेच घट्ट आहे. तसेच आजकाल पब्लिक संस्था, संघटित सत्ताधारी समाज, खाजगी संस्था यांचा सहकार (Partnership) वाढता आहे. PP-P यामध्ये पब्लिक ही संघटित सत्ता आहे व लोकशाहीतून राज्यशासन निर्माण झालेले असल्यामुळे त्यामध्ये प्रशासन, त्याने व घटनेने निर्माण केलेल्या संस्था यांचा त्यांत प्रामुख्याने समावेश होतो, पब्लिक संस्था संघटित व शासनाच्या बरोबर आहेत. तेव्हा या PP-P मध्ये सर्वसामान्य असंघटित समाज वगळला जातो. Public मध्ये सर्वसाधारण असंघटित समाज नाही (?); म्हणूनच पब्लिक म्हणजे समाज हे समीकरण इथे वास्तवात असत नाही. त्यामुळे सत्ता व समाज यांच्यातील विरोध व संघर्ष स्पष्ट दिसतो. हा विरोध उद्योगाच्या व निर्मितीच्या क्षेत्रात नाहीसा करावयाचा झाल्यास PPC-P-पब्लिक, प्रायव्हेट आणि कम्युनिटी/समाज यांच्यातील पार्टनरशिप निर्माण होणे भावी काळात आवश्यक आहे आणि परस्परांच्या शोषणाशिवाय व प्रत्येक पक्षाचे यश साधूनच (Win-Win Partnership) हा सहभाग निश्चित करावा लागेल.

नवे शिक्षण सर्व स्तरावर, के. जी. ते पी. जी.-पर्यंत लोकांना सहजतेने उपलब्ध झाल्यास शिकताना निर्माण केलेली समाजसंपत्ती ही सर्वांना विकासाचे साधन म्हणून वापरता येईल. ही प्रक्रिया

***शिक्षण- संघटन -निर्मिती- संपत्ती वृद्धी/राखण***

या प्रक्रियेतून जाते. आजच्या युगात निर्माण होत असलेला विश्वसमाज लोकशाही प्रक्रियेतून, निर्मितीतून व समाजाच्या सामूहिक मूल्यांचा व संपत्तीचा विकास करण्याच्या कार्यातूनच वृद्धिंगत होईल. समाजाची समतेच्या व न्यायाच्या पायावर उभारणी करण्यसाठी नवीन शिक्षणाने ह्या निर्मितीच्या व विकासाच्य प्रक्रिया फक्त शिक्षणातून शिकवाव्यात असे नव्हे, तर त्यांचे सततच्या आजीवन शिक्षण व विकासमार्गात रूपांतर करावयास हवे आणि सबलीकरणाच्या व सत्तानियंत्रणाच्या कार्यात सहभागी व्हावयास हवे.

एकूणच धर्माची शिकवण विचार व आचारात आणून आपल्या – व्यक्तिगत, गटांच्या आणि समाजाच्या – जीवनात व कार्यात रूपांतरित करून नवशिक्षणाचा, ज्याला महात्मा गांधींनी नइ तालीम म्हणून संबोधले तो

मार्ग, हा वैज्ञानिक धर्माच्या आचरणाचा मार्ग म्हणून स्वीकारण्याचा आपणास विचार करता येईल. हाच विचार विनोबा भावे यांनी शिक्षण म्हणजे योग, सहयोग व उद्योग या प्रक्रियांनी केला, तर महात्मा गांधींनी 'नइ तालीम' 'ही माझी भारतीयांस सर्वश्रेष्ठ भेट आहे' या शब्दांत सांगितले आणि सत्यरूपी परमेश्वराच्या साध्याचा मार्ग सुचविला.

वैज्ञानिक आणि शास्त्रीय पद्धतीने निर्माण झालेले नवे शिक्षण हे नव्या जोडलेल्या समाजाच्या भावी जीवनाचा मार्ग ठरावा, असे वाटते.

**पुढचा मार्ग :**

गेल्या दोन शतकांतील औद्योगिक क्रांतीने जो नवीन उद्योगप्रधान समाज निर्माण केला, तिच्यातील नवनवीन संकल्पना, प्रक्रिया आणि संपत्तिनिर्मितीचे विविध मार्ग यांनी मानवी समाजाच्या विकासाचा पाया रचला. प्रगती व आधुनिकतेच्या तसेच स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या संकल्पनांचा उदय झाला. एकविसावे शतक हे सतत जोडलेल्या आणि तंत्रज्ञानाने व वैश्विकतेने सबल व समृद्ध होत असलेल्या नव्या समाजाचे चित्र आहे. नवे शिक्षण नव्या युगाचे प्रारूप घडवण्यात, विविध मार्ग शोधण्यात व त्यांचा शास्त्रीय पद्धतीने विकास साधण्यात साहाय्य करणारे साधन ठरणार आहे. ते वापरणे व त्यासाठी व्यक्तिगत, सामाजिक व राष्ट्रीय उद्दिष्टे व ध्येये पुढे ठेवण्याचे कार्य सर्वांनाच करावयाचे आहे. २१ व्या शतकातील नवयुगाच्या समाजाचे भविष्य घडवण्यात व त्यासाठी कार्य करण्यास शेकडो वर्षांतून एकदाच मिळणारी ही संधी आज आपणा सर्वांपुढे आहे.





अनुक्रमणिका

# विज्ञान व धर्म - एकत्रीकरणाचा दृष्टिकोण

जयंत नारळीकर

(Science & Religion -Approach towards a Synthesis)

अनुवाद - राजेंद्र प्रभुणे

तिसऱ्या सहस्रकात शिरताना, आत्तापर्यंत ज्यांनी आपल्याला मार्गदर्शन केले अशा अनेक श्रद्धा व धर्मसंकल्पनांचा आपण बारकाव्याने पुनर्विचार केला पाहिजे. भारतात हे विशेषत्वाने खरे आहे; कारण अनेक प्रकारच्या श्रद्धा असलेल्या देशात आपण राहतो. या श्रद्धा व धर्मसंकल्पना जेव्हा रूढ झाल्या त्या काळापेक्षा सद्यःपरिस्थिती खूप वेगळी आहे. सर्वसामान्य भारतीयांच्या आयुष्यावर अधिकार गाजवणाऱ्या या धार्मिक रूढी आत्ता किती खऱ्या उतरतात? आत्ता त्या कितपत मार्गदर्शक ठरतात? नवीन वैज्ञानिक माहितीच्या पुरातही त्या अर्थपूर्ण ठरतात का? या प्रश्नांचा विचार करताना, आधुनिक समाजातील अनेक बदलांमागे विज्ञान हीच चालना आहे आणि दृष्टिक्षेपातील भविष्यात तरी ती तशीच राहण्याची शक्यता दिसते आहे, हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. आधुनिक युगातील धर्माचा विचार करताना धर्म व विज्ञानातील नाते आपण समजून घेतलेच पाहिजे.

माझ्या मनातील अनेक प्रश्नांतून माझी मते बनली आहेत. त्यांतील कित्येक प्रश्नांची उत्तरे मला देता येणार नाहीत. मी विज्ञानाचा विद्यार्थी असल्याने या विषयाबद्दल मला किती कमी ज्ञान आहे, हे कळण्याइतपत माझी प्रगती झाली आहे. त्यामुळे विसाव्या शतकातील सर्वश्रेष्ठ बुद्धिवंतांपैकी एकाच्या उक्तीचा मी आधार घेतो. 'नेचर' या प्रसिद्ध वैज्ञानिक नियतकालिकात लिहिताना प्रसिद्ध वैज्ञानिक अल्बर्ट आइन्स्टाइन यांनी म्हटले आहे :

*"पद्धतशीर विचाराच्या माध्यमातून, या जगातील जाणवणाऱ्या सर्व घटनांचे जास्तीतजास्त परिपूर्ण परस्पर-संबंधांत एकत्रीकरण करण्याचा विज्ञान हा कित्येक शतकांचा जाणीवपूर्वक प्रयत्न आहे. जास्त धाडसीपणाने असे म्हणता येईल की, संकल्पनात्मक विचारप्रक्रियेतून अस्तित्वाची पार्श्वभागी पुनर्निर्मिती करण्याचा हा प्रयत्न आहे. पण धर्म म्हणजे काय, हे मी स्वतःला विचारतो, तेव्हा मला इतक्या सहजपणे उत्तर सुचत नाही. या प्रश्नाचा ज्यांनी गंभीरपणे विचार केला आहे अशा सर्वांना, कोणत्याही परिस्थितीत, मी थोडेसुद्धा एकत्र आणू शकणार नाही."*

आइनस्टाइन यांची अडचण माझ्यासकट अनेक वैज्ञानिकांनाही जाणवते. मग दृष्टिकोणांच्या एकत्रीकरणाचा प्रयत्न का करायचा? असा प्रयत्न आवश्यक आहे; कारण, निरनिराळ्या धर्मांतही मतमतांतरे असली आणि विज्ञान व धर्माची आकलनपद्धती व कार्यपद्धती भिन्न असली तरीही ही दोन्ही क्षेत्रे, अस्तित्व आणि त्याला आधारभूत नैसर्गिक वातावरणाला समजून घेण्याच्या माणसाच्या प्रयत्नाचे प्रतिनिधित्व करतात. जर आपण वैज्ञानिक प्रयोगांचे बारकावे आणि धार्मिक कर्मकांड बाजूला ठेवून दोन्ही बाजूंना अपेक्षित बौद्धिक-वैचारिक ध्येये व महत्त्वाकांक्षांवर लक्ष केंद्रित केले, तर दोन्हींच्या सहअस्तित्वाला बराच वाव आहे.

विज्ञान व धर्माबद्दल हा दृष्टिकोण एकट्या आइनस्टाइन यांचाच आहे, असे नाही. अनेक थोर विचारवंतांनी हाच मुद्दा उचलून धरला आहे. त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून पुढे जाण्याचा मी प्रयत्न करत असलो, तरी थोर संस्कृत कवी व नाटककार कालिदासाला जे म्हणायचे होते, त्याबद्दल मी जागरूक आहे. त्याच्या *'रघुवंश'* या काव्याच्या आरंभी तो म्हणतो :

"फक्त उंच माणसाचा हात पोचेल अशा ठिकाणी असलेल्या फळासाठी हात वर करणाऱ्या बुटक्याप्रमाणे अल्पमती असूनही विद्वानाच्या यशाची अपेक्षा धरणाऱ्या माझे शेवटी हसे होईल." – *रघुवंश* १.३

पण या ओळी लिहिल्यानंतर कालिदासाने अद्वितीय काव्यनिर्मिती केली. त्याच्या ओळी उद्धृत केल्या तरी माझ्यासाठी मला तशी आशा वाटत नाही.

अनुक्रमणिका

**माणूस आणि विश्व**

विश्वाच्या सध्याच्या आकलनाला पूर्ण नक्कीच म्हणता येणार नाही; पण गेल्या काही दशकांत ते लक्षणीय रीत्या वाढले आहे. त्या आकलनाच्या पुनरावलोकनापासून आपण सुरुवात करू या. याचे कारण, विश्वाची निर्मिती, वाढ व विकास यांच्या अभ्यासातून आपल्याला हेच समजते की, माणूस किती क्षुद्र आहे; तो पाहू शकतो त्या विश्वाच्या विस्ताराच्या तुलनेत एका छोट्या ग्रहावरचे त्याचे अस्तित्व व अनुभव किती मर्यादित आहे. पृथ्वीवरचे आपले जीवन टिकवण्यासाठी आपण सूर्यापासून मिळणाऱ्या ऊर्जेवर अवलंबून आहोत. आपल्या आकाशातली सर्वांत प्रखर वस्तू म्हणजे सूर्य आपल्यापासून नशिबाने पुरेसा लांब (अंदाजे १५ कोटी किलोमीटर किंवा ५०० प्रकाश-सेकंद) आहे. त्यामुळे त्याच्या प्रखर उष्णतेपासून आपला बचाव होतो. पण रात्रीच्या आकाशात आपण बघतो त्या ताऱ्यांच्या तुलनेत तो आपल्या उंबरठ्यापाशीच आहे, असे आपल्याला खगोलशास्त्र शिकवते. सर्वांत जवळचा तारा 'मित्र' (Proxima Centauri) आपल्यापासून सव्वाचार प्रकाशवर्षे दूर आहे. म्हणजे, त्याच्यापासून निघालेला प्रकाश आपल्यापर्यंत पोचायला सव्वाचार वर्षे, ५०० प्रकाश-सेकंदांपेक्षा खूप जास्त, लागतात. खरेतर, वस्तुतः, ताऱ्यांच्या जगात सूर्याला कोणतेही विशेष स्थान नाही! तो सर्वांत प्रखरही नाही आणि मोठाही तारा नाही.

आपण पाहतो ते तारे म्हणजे आपल्या आकाशगंगेतील १०० अब्जांहून जास्त ताऱ्यांपैकी अगदी लहान अंश आहेत. आकाशगंगा एका तबकडीप्रमाणे असून तिचा व्यास एक लाख प्रकाश-वर्षे आहे. या शतकाच्या सुरुवातीपर्यंत, या विश्वात आपली आकाशगंगा हीच एकमेव वस्तू आहे, असा आपला, मानवी अहंकारातून जन्मलेला, ठाम विश्वास होता. म्हणजे खगोलशास्त्रज्ञाने दुर्बिणीतून पाहिलेले सर्वकाही याच आकाशगंगेतील आहे, असे आपल्याला वाटत होते.

१९२० साली या विश्वासाला तडा गेला. तेव्हा असे समजले की, खगोलशास्त्रीय फोटोंमध्ये दिसणारे अनेक धूसर ठिपके म्हणजे वास्तविक आपल्याच आकाशगंगेइतक्या मोठ्या आणि एकमेकांपासून करोडो प्रकाशवर्षे दूर असलेल्या आकाशगंगाच आहेत. आता 'हबल' (Hubble) अवकाश-दुर्बीण किंवा 'केक ' (Keck) सारखी मोठी भूस्थित दुर्बीण आपल्याला याहून विशाल व विलोभनीय विश्व दाखवत आहे. अनेक आकाशगंगांच्या पुंजक्यांचा एक गट, अशा अनेक गटांचे, १० कोटी किंवा त्याहून जास्त प्रकाशवर्षे व्यासाचे, अनेक महागट व मध्ये प्रचंड मोठ्या पोकळ्या, असे हे पद्धतशीरपणे प्रसरण पावणारे विश्व आहे. अशा विश्वात १० अब्ज प्रकाशवर्षे लांब पाहणाऱ्या या दुर्बिणींना अजून विश्वाच्या पसाऱ्याचा अंत दिसलेला नाही.

विश्व कशामुळे प्रसरण पावत आहे? आकाशगंगा पुंजक्यांत आणि महागटांत कशा एकत्र आल्या? त्याही आधी, वस्तू ज्यांपासून बनल्या ते मूलकण मुळात कसे बनले? अगदी कमी तापमानाच्या प्रारणाची पार्श्वभूमी असलेले विश्व आपण पाहतो आहोत. त्याचे मूळ कशात आहे? आत्ताच्या खगोलशास्त्रज्ञांनी हे प्रश्न उपस्थित केले आहेत. आधीच्या शास्त्रज्ञांनी, अगदी १०० वर्षांपूर्वी जेव्हा खगोलशास्त्र आपल्या आकाशगंगेपलीकडेही पोचले नव्हते, तेव्हाच्या शास्त्रज्ञांनी, विचारलेल्या प्रश्नांपेक्षा हे प्रश्न वेगळे आहेत. आपण आपल्या शोधाच्या शेवटाला पोचलो आहोत का? आपल्या आकाशगंगेपलीकडे काही आहे? हे प्रश्न आणि या पृथ्वीवरील माणसाच्या रहिवासाच्या तुलनेत विश्वाचा अतिप्रचंड पसारा यांचा या शतकातील काही थोर वैज्ञानिकांवर मोठाच परिणाम झाला.

ब्रिटिश खगोलवैज्ञानिक प्रा. आर्थर स्टॅन्ले एडिंग्टन म्हणाले होते, *"विश्वाच्या आकलनाचा प्रयत्न करणारा माणूस म्हणजे, विस्तीर्ण सागर कसा आहे हे जहाजाच्या हालचालीवरून समजून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्या जहाजावरील माल ठेवण्याच्या जागेतील असंख्य बटाट्याच्या पोत्यांपैकी एका पोत्यातील एका बटाट्यातील छोट्या किड्याप्रमाणे आहे."* विश्व प्रसरण पावत आहे या १९२९ साली हबल यांनी लावलेल्या शोधाच्या सुमारास, खगोलशास्त्र प्रगत होत होते त्या सुमारास, ते हे म्हणाले. ४० वर्षांनंतर आणखी एक खगोलवैज्ञानिक प्रा. फ्रेड हॉयेल म्हणाले, *"भौतिक शास्त्राचे संपूर्णपणे आकलन करू शकेल इतका प्रगत मेंदू असणारा मानव या*

*ग्रहावर उत्क्रांत होऊ शकेल हे फार असंभवनीय आहे, असे मला वाटते. एक म्हणजे हे मला मुळातच अशक्य वाटते आणि जरी हे शक्य असले तरी या परिस्थितीपर्यंत आपण आत्ता १९७० सालीच पोचलो आहोत, हे नक्कीच असंभवनीय आहे."*

एक संदर्भचौकट आखण्याकरता मी हे बारकावे सांगत आहे. ज्यांचा माझ्या विचारांवर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष प्रभाव पडला, त्या माझ्या भोवतालच्या वातावरणाबद्दल व माझ्या वारशाबद्दलही मला काही सांगितले पाहिजे. ज्यांच्या लेखनातील ऐहिक तत्त्वज्ञान आजही लोकांना प्रभावित करत आहे व मार्गदर्शन करता आहे, त्या संत ज्ञानेश्वरांची (१२७५-९६) ७०० वी पुण्यतिथी नुकतीच जिथे साजरी केली गेली, त्या महाराष्ट्रातून मी आलो आहे. वैश्विक सत्याच्या शोधात शोधाच्या अनेक मार्गांच्या एकमेकांमधील सहिष्णुतेचे महत्त्व त्यांनी अधोरेखित केले आहे. त्यानंतरच्या या ७०० वर्षांत विज्ञानाने लक्षणीय प्रगती केली आहे. त्याच्या विधायक आणि विघातक सामर्थ्याची आणि समाजावरील प्रभावांची स्वच्छ कल्पना आज सर्वांना आहे. त्यामुळे अनेकजण विज्ञानाकडे प्रस्थापित धर्मांपुढचे आव्हान या दृष्टीने बघतात.

**एकच ध्येय – सत्याचा शोध**

इथे मी माझ्या काहीशा मर्यादित पण वास्तव दृष्टिकोणातून धर्म विरुद्ध विज्ञान या वादातील बाबींवर प्रकाश टाकू इच्छितो. धर्म आणि विज्ञान, दोन्ही माणसाच्या सत्याच्या शोधाचे पण वेगळे वेगळे मार्ग आहेत. सत्य म्हणजे काय यासंबंधीच्या त्यांच्या संकल्पनाही वेगळ्या आहेत.

निसर्ग, नैसर्गिक घटना, सूर्य-चंद्र, ग्रह-तारे, विजांचे चमकणे, ढगांचा गडगडाट, लहानमोठ्या सजीव गोष्टी, विश्वाची उत्पत्ती इत्यादींसंबंधी माणसाच्या कुतूहलातून विज्ञानाचा जन्म झाला. वैज्ञानिक पद्धती विकसित होऊन स्थिरावायला अनेक शतके गेली, पण त्यानंतर ती झपाट्याने पसरली. प्रयोग, निरीक्षण, सिद्धान्त आणि भविष्यानुमान हा या पद्धतीचा पाया आहे. निसर्गासंबंधीच्या एका टप्प्यापर्यंतच्या आकलनानंतर वैज्ञानिकांना पुढचे प्रश्न पडले, त्यांची उत्तरे शोधण्याच्या प्रयत्नातून ते आकलनाच्या पुढच्या टप्प्यावर पोचले. तिथे, ज्यांची त्यांनी आधीच्या आकलनाच्या टप्प्यावर कधी अपेक्षाही केली नव्हती, असे नवीन प्रश्न त्यांची वाट पाहत होते.

ग्रह, तारे, आकाशगंगा, त्यांचे लहान गट, मोठे गट. रचनेच्या पुढच्या प्रत्येक टप्प्याला प्रस्थापित वैज्ञानिकांचा प्रतिरोध होता. शिडीच्या पुढच्या टप्प्यासाठी मोजकेच वैज्ञानिक आपली बाजू मांडत होते; पण त्यांना धुडकावून लावले जात होते. परंतु, शेवटच्या विश्लेषणात या थोड्या वैज्ञानिकांचे मत ग्राह्य धरले गेले; कारण वैज्ञानिक निर्णय शेवटी वस्तुस्थितीनुसार ठरवले जातात, मताधिक्यावर नव्हे.

आणि म्हणून विज्ञान अधिक सूक्ष्म पातळीवर नवीन वास्तव शोधत असते आणि त्याच्या ज्ञानाचा पाया विस्तारत जातो. ही न संपणारी प्रक्रिया आहे. पण आत्तापर्यंत, माणसाच्या मनाचे कार्य, त्याच्या भावना आणि जाणण्याची इच्छा, यांसंबंधीच्या प्रश्नांचा उलगडा करण्यात ही प्रक्रिया अयशस्वी ठरली आहे. मनुष्य का निर्माण झाला? इतक्या प्रकारचे सजीव का अस्तित्वात आहेत? या निर्मितीचा हेतू काय? मुळात वैज्ञानिक नियम का आहेत? पृथ्वीसारख्या सूक्ष्म ग्रहावरच्या क्षुद्र मानवाने शोधलेले हे वैज्ञानिक नियम तारे आणि आकाशगंगांच्या वैश्विक पातळीवरही लागू पडताना का दिसत आहेत?

वैश्विक सत्यासंबंधीचे हे प्रश्न विज्ञानाच्या कक्षेबाहेर आहेत, असे वाटते. इथे धर्म प्रवेश करतो. या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी निरनिराळ्या धर्मांनी निरनिराळे वैचारिक आकृतिबंध पुरवले आहेत. निरनिराळ्या परिस्थितींत निर्मात्याच्या-देवाच्या भूमिकेचे परिमाणही निरनिराळे आढळतात. धर्माच्या माध्यमातून ज्ञान मिळवण्याच्या प्रयत्नांचीही एक उतरंड आढळते. उदाहरणार्थ, गीता सांगताना कृष्ण अर्जुनाला म्हणतो :

*"(एकाग्रतेच्या) प्रयत्नांपेक्षा खरोखर ज्ञान चांगले, ज्ञानापेक्षा ध्यान चांगले, ध्यानापेक्षा कर्मफलाचा त्याग चांगला; त्यामुळे तात्काळ मन:शांती मिळते."*

*– गीता १२.१२*

व्यक्ती साध्य करू शकेल अशी एक अत्युच्च पूर्णत्वाची स्थिती सर्व धर्मांत आहे. तो मोक्ष असेल,

निर्वाण असेल, स्वर्ग असेल किंवा इतर काही. ही अशी स्थिती आहे, जिथे सर्व प्रश्नांची उत्तरे मिळालेली आहेत.

एका अर्थी विज्ञानालाही या स्थितीला पोचायला आवडेल; पण हे कधी घडेल हे अशक्य वाटते. खरेतर या ध्येयाने प्रेरित झालेल्या धार्मिक वाटसरूला या शोधाच्या शेवटी शांती व समाधान मिळेल. पण याउलट, एकदा का सर्व प्रश्नांची उत्तरे मिळाली की, असे विश्व वैज्ञानिकाला अत्यंत नीरस आणि कंटाळवाणे वाटेल.

**वेगळे मार्ग**

सत्य अपूर्ण असते हे खरेच; पण वैज्ञानिक सत्य धार्मिक सत्यापेक्षा वेगळेही असते. विज्ञान वस्तुनिष्ठतेवर, प्रयोग पुनःपुन्हा केल्यावर दर वेळी तोच निष्कर्ष येतो हे दाखवण्यावर आणि निष्कर्षांच्या वैश्विक पातळीवरील सत्यतेवर भर देते. त्यामुळे 'अ' वैज्ञानिकाचे दावे निरीक्षणाने आणि प्रयोगाने 'ब', 'क', 'ड' इत्यादी वैज्ञानिकांना सिद्ध करता आले नाहीत, तर त्यांकडे संशयाने पाहिले जाते. जर पिसाच्या मनोऱ्यावरून टाकलेल्या दगडाचा वेग (दगड टाकल्यापासूनच्या) वेळेच्या प्रमाणात वाढतो असे गॅलिलिओला आढळले असेल, तर असाच प्रयोग कोणीही सोम्या-गोम्याने केला तरी हाच निष्कर्ष आला पाहिजे.

पण धार्मिक अनुभवाची गोष्ट वेगळी आहे. जेव्हा कृष्णाने अर्जुनाला विश्वरूप दर्शन दिले तेव्हा तो म्हणाला :

*"हे अर्जुना, तुझ्याशिवाय कोणाही मानवाने वेदांतून, त्यागातून, अभ्यासातून, मला भेटी देऊन, अर्घ्य देऊन, समारंभपूर्वक केलेल्या धार्मिक क्रियांतून, कठोर तपश्चर्येतून, वा कोणत्याही प्रकारे माझे हे रूप पहावे, अशी इच्छा मी करू शकत नाही."*

*- गीता ११.४८*

याप्रमाणे फक्त अर्जुनाला या विश्वरूपाचे दर्शन घेण्याचे भाग्य लाभले. पण, 'फक्त मी प्रोटॉन-ऱ्हासाची प्रक्रिया बघितली; इतर कोणी ती बघू शकणार नाही', असे म्हणून कोणीही वैज्ञानिक आपली सुटका करून घेऊ शकणार नाही.

वैज्ञानिकांचा वस्तुनिष्ठतेचा आग्रह विरुद्ध धर्मातील आत्यंतिक व्यक्तिनिष्ठ अनुभव, ही सत्याच्या आकलनाची पद्धत हा विज्ञान आणि धर्मातील मुख्य फरक आहे. काही मोजक्या लोकांच्या अशा व्यक्तिनिष्ठ व एकमेवाद्वितीय अनुभवांवर विश्वास ठेवायला वैज्ञानिकांना सांगितले जाते, तेव्हा मतभेद होतात. जे ते स्वतः पाहू किंवा अनुभवू शकत नाहीत, त्यावर ते अर्थातच विश्वास ठेवणार नाहीत. याउलट, द्रष्ट्यावर/साक्षात्कारी व्यक्तीच्या अनुभवाच्या (साक्षात्काराच्या) खरेपणावर त्याचा सच्चा धार्मिक भक्त प्रामाणिकपणे श्रद्धा ठेवतो. तो खरोखर अविश्वास दाखवणाऱ्या वैज्ञानिकालाच उद्धट आणि हेकट समजू शकतो.

दुसरे म्हणजे आपण सिद्ध केलेल्या सत्याच्या अपूर्णतेची जाणीव असल्याने वैज्ञानिकाला संपूर्ण सत्याचे ध्येय गाठण्यातील अवघडपणा माहीत असतो. याउलट, धर्माला संपूर्ण ज्ञान आहे, पुन्हा अर्थातच काही निवडक लोकांच्या अनुभवांवर आधारित, असे बहुतेक सर्व धर्म सांगतात. अशा दाव्यांतील ठामपणा व अधिकाराच्या छटेमुळे वैज्ञानिक अस्वस्थ होतात. धर्म व विज्ञानातील हे भेद व मतभेद प्रामाणिक आहेत. ते समजून घेतले पाहिजेत व त्यांबद्दल व एकमेकांबद्दल सहिष्णू असले पाहिजे. पण यातील गुंतागुंत वाढवणाऱ्या इतरही बाबी आहेत.

बहुतेक धर्मांची सुरुवात व वाढ नैतिक परस्पर-व्यवहाराचे नियम या स्वरूपात झाली. समाज म्हणून काही लोकांच्या गटाने एकत्र राहण्यासाठी हे आवश्यक आहे. त्यामुळे त्यांत अनेक 'हे करा, हे करू नका' अशा गोष्टी नक्कीच असतात. उदाहरणार्थ, दहा आज्ञा. याशिवाय माणसाच्या मनःशांतीसाठीही धर्मांनी अनेक पद्धती विकसित केल्या. या पद्धतींनी नंतर माणसाच्या विचारपद्धतीला आकार दिला.

परंतु जेव्हा या प्रामाणिक आणि व्यावहारिक सूचना व तथाकथित धार्मिक कर्मकांडांची मिसळ व गल्लत झाली व नंतर कर्मकांडांचाच प्रभाव वाढला, तेव्हा प्रश्न निर्माण झाले. एका टप्प्यावर राशीभविष्य आणि त्यांतील 'ग्रहांची शांती' वगैरे यांचाही यात शिरकाव झाला. त्यात चमत्कार व ते करणाऱ्यांची भर पडली. ते आजही चालू आहे. विद्वत्तेचा प्रभाव पाडू न शकणाऱ्या शिक्षकाला



अनुक्रमणिका

ज्याप्रमाणे विद्यार्थ्यांचा आदर मिळवण्यासाठी क्लृप्त्या कराव्या लागतात, त्याप्रमाणे भोंदू धर्मगुरूंना आपल्या शिष्यगणांवर छाप पाडण्यासाठी तथाकथित चमत्कारांचा आश्रय घ्यावा लागतो. आता जेव्हा वैज्ञानिक कसोटीवर चमत्कार उघडे पडतात; पत्रिका, राशीभविष्य इ. अवैज्ञानिक व निरुपयोगी आहे असे सिद्ध करून दाखवलेले आढळतं, त्या वेळी वैज्ञानिक धर्माबाबत उदासीनता दाखवतात आणि त्याला अंधश्रद्धेचे साधन समजतात, यात काहीच आश्चर्य नाही.

ज्याप्रमाणे या छद्म-धार्मिक कर्मकांडांमुळे धर्म बदनाम होतो, त्याचप्रमाणे मूलतत्त्ववादाच्या नावाखाली खपवल्या जाणाऱ्या असहिष्णुतेमुळेही तो बदनाम होतो. मूलतत्त्ववाद प्रश्न विचारण्याला प्रतिबंध करतो व म्हणून तो वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या पूर्ण विरुद्ध आहे. शिवाय वैज्ञानिक सत्ये धार्मिक मूलतत्त्ववादाच्या पचनी पडत नाहीत आणि म्हणून तो त्यांना आणि विज्ञानालासुद्धा प्रतिकार करतो.

सध्याच्या धार्मिक वातावरणाबद्दल ही टिपण्णी केल्यावर मला लगेच हेही म्हणावे लागेल की, पाटी विज्ञानाच्या बाजूनेही स्वच्छ नाही. विज्ञानाचे व्यवच्छेदक लक्षण असलेली वस्तुनिष्ठता धूसर होताना आणि वैज्ञानिक मूलतत्त्ववाद डोके वर काढताना दिसत आहे. हे वैज्ञानिकांवरील वाढत्या सामाजिक दबावाचे लक्षण आहे. पृथ्वी सूर्याभोवती फिरते ही उपपत्ती मांडताना कोपर्निकस आणि गॅलिलिओला याच मूलतत्त्ववादामुळे हाल सोसावे लागले. ते ज्या मूलतत्त्ववादाला सामोरे गेले तो धार्मिक होता, असे एखादा म्हणू शकेल. पण हे अर्धसत्य आहे. कारण मार्टिन ल्यूथरसारखे विद्वान, जे कॅथॉलिक धर्मगुरू नव्हते, त्यांनीही या उपपत्तीला विरोध केला. एखादा असे म्हणू शकतो की, महत्त्व आणि सुरक्षित स्थान सोडावे लागण्याच्या भीतीने सोळाव्या आणि सतराव्या शतकांतील विद्वान, 'पृथ्वी सूर्याभोवती फिरते' या उपपत्तीची जाहीरपणे बाजू घेण्याला कचरत होते.

सध्याच्या विज्ञानाला चालना देणारी बले आपण आता पाहू. आत्ताच्या विज्ञानाची प्रगती कशी होते हे समाजशास्त्रावरची टिप्पणी दर्शवते. समजा, तुम्ही एका लोकप्रिय उपपत्तीची भलावण करत आहात. कोणत्याही वैज्ञानिक संशोधनासाठी आत्ताच्या काळात खूप पैसे लागतात आणि हे पैसे सहसा सरकारकडून येतात. तुम्हाला त्यासाठी अर्ज करावा लागतो. जर तुम्ही आधीच तुमची विश्वासार्हता प्रस्थापित केली असेल तर तुमच्या अर्जाचा विचार करणारे म्हणतील की, हे सुरक्षित मागणीपत्र (Proposal) आहे आणि ते त्यासाठी निधी उपलब्ध करून देतील. पण जर तुम्ही प्रस्थापित मताबद्दल शंका उपस्थित करणाऱ्या संशोधनासाठी पैसे मागितले तर त्यावर विचार करणारे म्हणतील की, यातून काय निष्पन्न होईल सांगता येत नाही, तर यावर पैसे वाया घालवायला नकोत.

जिऑफ्रे बर्ब्रिज यांनी नॅशनल सायन्स फाउंडेशनकडे (विश्व महा-विस्फोटातून - 'बिग बँग' - निर्माण झाले या प्रचलित मतप्रवाहावर शंका उपस्थित करणाऱ्या) 'स्थिर-सदृश स्थितीतील विश्वसंकल्पना' या विषयावर संशोधन करण्यासाठी एकदा पाठवलेले मागणीपत्र एका मान्यवराने, कोणत्याही संशोधक किंवा पदव्युत्तर विद्यार्थ्याला अशा खुळचट कल्पनेवर काम करायला परवानगी देता कामा नये, या मुद्द्यावर नाकारले. दुसऱ्या मान्यवरांनी लिहिले की, ज्या अर्थी कोणीही संशोधक किंवा पदव्युत्तर विद्यार्थी या विषयावर काम करत नाही, त्या अर्थी ही कल्पना असुरक्षित आणि खुळचट असली पाहिजे. तेव्हा इथे तुम्ही दुष्टचक्रात अडकता! संशोधनाच्या मागणीला परवानगी आणि निधी उपलब्ध झाल्याशिवाय कोण संशोधक किंवा पदव्युत्तर विद्यार्थी या विषयावर काम करताना आढळेल? या प्रकारचा 'सावध' दृष्टिकोण सर्वमान्य मतप्रवाहाला आव्हान देणाऱ्या कल्पना मुळातच मारून टाकेल.

'नेचर'मधील सहस्रकातील लेखात कै. प्रो. चंद्रशेखर यांच्याकडून ऐकलेली घटना मी उद्धृत केली आहे. ते म्हणाले, की १९३० सालाच्या शेवटी 'माउंट पॅलोमार' येथील २००"दुर्बिणीला निधी देण्याचा निर्णय जेव्हा घेतला गेला, तेव्हा बोलावलेल्या वार्ताहर परिषदेत हबल आणि एडिंग्टन हजर होते. त्यांना विचारले गेले, "सर, तुम्ही ही दुर्बीण उभाराल तेव्हा तुम्हाला काय सापडेल अशी अपेक्षा आहे?" ते म्हणाले, "याचे उत्तर जर तुम्हाला








आधीच माहीत असते तर ती उभारण्याची आवश्यकताच नाही." हे पूर्ण खरे आणि प्रामाणिक उत्तर होते. पण आज जर तुम्ही दुर्बीण उभारण्यासाठी मागणीपत्र दिले तर, त्यातून तुम्हाला काय सापडण्याची अपेक्षा आहे हे सांगणारे सविस्तर कारण तुम्हाला द्यावे लागेल. याचा अर्थ, तुम्हाला काय सापडणार हे तुम्ही आधीच ठरवले आहे; म्हणजे ज्यावर तुमचा आधीच विश्वास आहे त्यावर ते आधारलेले आहे. म्हणजे, अचानक, केवळ नशिबाने, सापडणारी एखादी गोष्ट सोडली तर तुम्ही नवीन काहीच शोधणार नाही आहात.

खगोलशास्त्रासारखे मूलभूत विज्ञान सध्या ज्या दिशेने जाते आहे, ते दुर्दैवी आहे. खूप मोठा पैसा गुंतलेला असल्याने वैज्ञानिक सुरक्षित खेळी खेळू पाहत आहेत. त्यामुळे धाडसी गुंतवणुकीला विज्ञानात वाव नाही. धाडसी कल्पनांचा पाठपुरावा करण्यासाठी निधीचा काही भाग तरी राखून ठेवावा, असे माझे म्हणणे आहे. हे आपल्याला कितीही वेडगळपणाचे वाटले तरी जर मागणी करणाऱ्याने आपला प्रामाणिकपणा सिद्ध केला असेल, जर त्याने आत्तापर्यंत चांगले काम (संशोधन) केले असेल आणि आता तो नवीन वाट शोधतो असे म्हणत असेल, तर आपण त्याच्या प्रकल्पाला पाठिंबा दिला पाहिजे. मला वाटते, विज्ञानाला धोपटमार्गावर अडकून पडण्यापासून वाचवण्याचा हा एकच मार्ग आहे.

या संदर्भात भारतातील परिस्थिती पाश्चात्त्य जगतापेक्षा जास्त आशादायक वाटते. भारतातही मागणीपत्रांचा आढावा घेणारी यंत्रणा आहे. पण ती पाश्चात्त्यांइतकी ताठर आणि किचकट नाही. हे कमकुवतपणाचे लक्षण आहे, असे काही वेळा म्हटले जाते. पण ती ताकदही असू शकते. पाश्चात्त्य जगात जे धाडसी प्रकल्प अकार्यक्षम वाटले असते, त्यांना भारतीय परिस्थितीत परवानगी दिली जाऊ शकते. निरीक्षणासाठी पुरेसा वेळ मिळण्यात 'चिप' आर्पला (हिल्टन ख्रिश्चन "चिप" आर्प – अमेरिकन खगोलवैज्ञानिक व महा-विस्फोट सिद्धान्ताचा टीकाकार) भारतीय दुर्बिणींच्या बाबतीत नक्कीच कमी अडचणी आल्या असत्या. म्हणून मला वाटते, नवीन कल्पनेला भारतात पाश्चात्त्य जगापेक्षा जास्त वाव आहे. 'कौन्सिल ऑफ सायंटिफिक ॲण्ड इंडस्ट्रिअल रिसर्च' या संस्थेचे संचालक श्री आर. ए. माशेलकर यांनी नवीन कल्पना व प्रकल्प तपासणे आणि त्या दिशेने प्रयत्न करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याचे धाडसी पाऊल उचलले आहे. त्यातून ताजेपणा असलेले, ज्याची क्षमता कालांतराने दिसेलच, असे काम निर्माण होते आहे. नवीन कल्पनांच्या दिशेने प्रयत्न करण्याची इच्छा आत्मविश्वासदर्शक आहे. याउलट, दुसऱ्या पर्यायांच्या दिशेने होणारे प्रयत्न दडपणे हे असुरक्षिततेच्या भावनेचे निदर्शक आहे.

स्वतःच्या विश्वासांच्या दुराग्रहाने कदाचित भरकटलेले अनेक प्रथितयश वैज्ञानिक, त्यांची रुळलेली वाटच विश्वासंबंधीच्या खऱ्या आणि अंतिम सत्याचे प्रतिनिधित्व करते, असे समजण्यात बहुधा आत्मवंचना करताना दिसतात. हे ते इतक्या टोकापर्यंत करतात की, आपल्या शोधांचा शेवट जवळ आला आहे, यावर त्यांचा खरेच विश्वास असतो. वास्तविक सत्य याच्या उलट असते. आत्मसंतुष्टतेची भावना ही, वापरून गुळगुळीत झालेल्या पद्धतीच्या उपयुक्ततेचा शेवट आला आहे आणि काहीतरी नवीन व वेगळ्या गोष्टीची गरज आहे, याची निदर्शक आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस गुरुत्वाकर्षण, विद्युत्चुंबकीय आणि उष्मागतिकी यांच्या सिद्धान्तांतील वेगवान प्रगतीमुळे अनेक वैज्ञानिकांना वाटू लागले की, भौतिक विज्ञानाचा शेवट जवळ आला आहे. विसाव्या शतकातील पहिल्या दोन दशकांतच सापेक्षता आणि पुंजयामिकी या दोन मुख्य क्रांतिकारक सिद्धान्तांनी हे भाकित खोटे ठरवले. स्टीफन हॉकिंगसारखा वैज्ञानिक १९८० मध्ये, भौतिक विज्ञानाचा शेवट पुढच्याच वळणापलीकडे आहे असे म्हणतो, तेव्हा इतिहासाची पुनरावृत्ती होताना पाहून गंमत वाटते. ते वळण आत्ताच मागेमागे दूर जाताना दिसत आहे. विज्ञानाची आवडती प्रतिमा अशी दूर जाताना पाहून, साक्षेपी/शहाणा सामान्य माणूस विज्ञानाच्या अचूकतेबद्दल आणि विज्ञानाला सर्व श्रेय देण्यातील (विज्ञानाच्या टोपलीत बुद्धीची सर्व अंडी टाकण्यातील) शहाणपणाबद्दल शंका घेताना दिसला, तर ते साहजिकच आहे.

**देव संकल्पना**

तुमचा देवावर विश्वास आहे का, असे वैज्ञानिकांना

अनुक्रमणिका






नेहमी विचारले जाते. हा प्रश्न वाटतो तितका साधा नाही. कारण देवाची कल्पना व्यक्तिव्यक्तीप्रमाणे इतकी बदलती आहे की, कोणतेही साधेसरळ उत्तरही गैरसमज निर्माण करणारे ठरू शकते. विश्व कसे नियमबद्ध आणि सुरळीत चालते हे दाखवून वैज्ञानिकाने देवाचे अस्तित्व सिद्ध करण्याची अपेक्षा आहे का? देवाच्या अस्तित्वाची कल्पना केल्याने त्याला वैज्ञानिक नियम व विश्वरहस्य उलगडायला मदत होणार आहे का? वैज्ञानिक तर्कशास्त्राप्रमाणे विचार केल्यास, जे माहीत आहे त्याला पुष्टी देणारी नवीन उपपत्ती मांडल्याने आपल्या आकलनात काही फरक पडत नाही. थोडक्यात, वैज्ञानिकाला हा प्रश्न विचारणे (तो वैज्ञानिक आहे म्हणून) अन्यायाचे आहे.

विश्व या वैज्ञानिक नियमांनुसार(च) का चालते, किंवा हे आणि फक्त हेच नियम असावेत हे कोणी ठरवले, हे विज्ञानाच्या कक्षेबाहेरचे प्रश्न आहेत. ते सोडवण्यासाठी देव संकल्पना आपल्याला फार पुढे नेत नाही. पण विश्वाच्या संचालनाचे काही मूळ नियम आहेत व हे नियम शोधणे हा विज्ञानाचा उद्देश आहे, ही वैज्ञानिकांची श्रद्धा आहे.

वैज्ञानिकांची उत्तरे वेगवेगळी असू शकतात यावरून एवढेच सूचित होते, की "काळ्या वस्तूवर (Dark Matter) तुमचा विश्वास आहे का", या प्रश्नाच्या उत्तराप्रमाणे "देव आहे का" याचे उत्तर वस्तुनिष्ठपणे देता येऊ शकत नाही. आइनस्टाइन याकडे असे बघतात :

*"मानवाच्या आध्यात्मिक उत्क्रांतीच्या सुरुवातीच्या काळात, मानवाने कल्पनेतून, स्वतःच्या प्रतिमेप्रमाणे, देवांना निर्माण केले. त्यांनी स्वतःच्या इच्छेप्रमाणे इहसृष्टी नियंत्रित करावी, किंवा किमानपक्षी तिच्यावर प्रभाव टाकावा, अशी अपेक्षा होती. पण त्यांनी त्यांची इच्छा आपल्याला अनुकूल होईल अशी बदलावी, असे करण्याचा प्रयत्न माणसाने केला. त्यासाठी त्याने जादू किंवा देवांची प्रार्थना केली. आत्ताच्या धर्मांत शिकवली जाणारी देवाची अशी कल्पना हे जुन्या कल्पनेचे बदललेले विकृत स्वरूप आहे. इच्छापूर्तीसाठी प्रार्थनेतून आवाहन करण्यातून दैवी शक्तीचे मानवी स्वरूपच दिसते (देवाचे अवमूल्यन)."*

माणसाचे प्रश्न सोडवण्यासाठी हस्तक्षेप करणाऱ्या किंवा त्याच्या चुकीच्या वागण्याची शिक्षा कमी करणाऱ्या व्यक्तिगत देवाला आइनस्टाइन इथे विरोध दर्शवतात. अशा हस्तक्षेपामुळे देव माणसाइतक्या खालच्या पातळीवर येईल आणि नवीन विरोधाभास निर्माण होतील.

आता या नेहमी दिसणाऱ्या घटनेची कल्पना करा. 'अ' हा कॉलेजमधील विद्यार्थी नियमित अभ्यास करत नाही आहे आणि आता परीक्षा जवळ आल्यावर त्याला जाणीव होते की, पुढच्या करियरसाठी आवश्यक उत्तम गुण त्याला मिळू शकणार नाही आहेत. म्हणून तो देऊळ किंवा धार्मिक स्थळी जातो आणि दैवी शक्तीला काही अर्पण करतो. याच परिस्थितीतील विद्यार्थी 'ब' जास्त जमिनीवर आहे. तो परीक्षकांनाच शोधून त्यांना लाच देतो. याउलट, तिसरा विद्यार्थी 'क' वर्षभर प्रामाणिकपणे झटून अभ्यास करत आहे आणि त्याला उत्तम गुण मिळण्याबद्दल आत्मविश्वास आहे. देवाच्या नैतिकतेबद्दलच्या 'अ'च्या अपेक्षा 'ब'च्या परीक्षकांबद्दलच्या अपेक्षांहून वेगळ्या आहेत का? जर देवाने खरोखरच प्रार्थना ऐकून 'अ'ची इच्छा पूर्ण केली, तर देव लाचखाऊ परीक्षकाच्याच पातळीवर येत नाही का? आणि या सगळ्या प्रकारात 'क'वर अन्याय होत नाही का?

आइनस्टाइन यांचा अशा देवाबद्दल आक्षेप आहे. ते म्हणतात :

*"समाजाच्या नैतिक भल्यासाठी धर्म शिकवणाऱ्यांनी अशा व्यक्तिगत देवसंकल्पनेवरील श्रद्धेला, म्हणजेच धर्मगुरूंच्या हाती मोठी सत्ता सोपवणाऱ्या भीती आणि आशा यांच्या या स्रोताला, सोडून द्यायला हवे."*

त्याऐवजी, अगदी सूक्ष्म पातळीपासून अतिभव्य पातळीपर्यंतच्या विश्वाच्या सुसूत्रतेमागचे सत्य शोधणाऱ्या विज्ञानाला धर्म मदत करेल, अशी त्यांना आशा वाटते. कारण निसर्गाच्या कार्यातील दृश्य तार्किकतेमागील रहस्य समजण्यासाठी अजून खूप शिकणे बाकी आहे.

या उदाहरणांनी या प्रश्नावरच्या निरनिराळ्या मतांवर प्रकाश पडतो. म्हणून जेव्हा कुणी मला विचारते की, एक वैज्ञानिक म्हणून तुम्ही देवावर विश्वास ठेवता का? तेव्हा मी म्हणतो, याचे उत्तर देणे माझ्यासाठी फारच अवघड आहे आणि जरी मी प्रयत्न केला तरी माझे उत्तर दिशाभूल करणारे असू शकते. कारण माझे

उत्तर ऐकणारा त्याच्या देवसंकल्पनेच्या आकलनानुसार, जे माझ्या आकलनापेक्षा संपूर्णपणे वेगळे असू शकेल, या उत्तराचा अर्थ लावणार.

**धर्म आणि विज्ञान – परस्परपूरकता आणि एकत्रीकरण**

वास्तव आणि आदर्श यांच्यात फारकत करणाऱ्या या समस्या असताना या दोन्हींतील ही दरी भरून काढण्यासाठी आपण काय करू शकतो? त्यासाठी हे ओळखणे जरूरीचे आहे की, धर्म आणि विज्ञान माणसाच्या मनाच्या परस्परपूरक ऊर्मींचे व अपेक्षांचे समाधान करतात. दोन्ही एकमेकांच्या क्षेत्रात प्रवेश (घुसखोरी) करू पाहतात तेव्हा प्रश्न निर्माण होतात. म्हणून धार्मिक विचारांमागची वेगळी पार्श्वभूमी लक्षात घेतल्याशिवाय त्यावर शेरेबाजी करणे वैज्ञानिकांनी टाळावे आणि धार्मिक विचारवंतांनी आपल्या (धार्मिक) विचारांसाठी वैज्ञानिक समर्थन शोधण्याचा प्रयत्न करू नये.

धर्म आणि विज्ञानाची जोडणी किंवा किमान सह-अस्तित्वासाठी अनेक गोष्टी करणे शक्य आहे. एक म्हणजे, विज्ञानाने उघड केलेल्या विश्वासंबंधीच्या लहान-मोठ्या नवीन वास्तवांनुसार आपली धार्मिक तत्त्वज्ञाने जुळवून घेण्याचे व्यावहारिक भान धर्मांनी ठेवावे. धार्मिक विश्वास आणि संकल्पना वैज्ञानिक वास्तवाशी सुसंगत असाव्यात. याउलट, आपल्या ज्ञानाच्या अपूर्णतेचे भान वैज्ञानिकांनी कायम ठेवावे आणि म्हणून नवीन कल्पना व संकल्पना स्वीकारायची त्यांनी तयारी ठेवावी. जेव्हा वैज्ञानिकांची मानवी मेंदूच्या कार्याची समज वाढेल, तेव्हा त्यांच्या संशोधनांमुळे वास्तव, भान आणि अस्तित्वाचा हेतू यांसंबंधीच्या तत्त्ववेत्त्यांच्या विचारांत भर पडेल. याप्रमाणे, वैज्ञानिक नियम आज (व कदाचित कधीच) पोचू शकणार नाहीत अशा निदान काही संकल्पना, क्षेत्रे व अनुभव असू शकतील, याची वैज्ञानिकांनी कायम स्वतःला आठवण करून दिली पाहिजे.

थोडक्यात, वास्तवाचे भान ठेवल्यास एकमेकांकडून घेण्यासारखे खूप आहे. या संदर्भात मला 'ईशावास्योपनिषदा'तील नेहमी उद्धृत केली जाणारी ओळ आठवते–

*"अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते"*

या ओळीचा अर्थ लावताना मी स्वतःला वैदिक तज्ज्ञ समजत नाही. अविद्येचा (क्रिया आणि कर्मे) मृत्यूला पार करण्यासाठी उपयोग करता येऊ शकतो आणि आध्यात्मिक ज्ञान अत्युच्च आनंदाचे अमृत पचवण्यासाठी मदत करू शकते. अविद्येचा भाग असलेल्या विज्ञानाने आपले ऐहिक जीवन व वर्तणूक नियंत्रित केली आहे. त्याला आध्यात्मिक ज्ञानातून आलेल्या धर्माची जोड देऊन आपण अत्युच्च आनंदाचा लाभ घेऊ शकतो.





अनुक्रमणिका






# विज्ञान, अध्यात्म आणि विश्वकर्म्याचा वंशज - मनुष्यधर्म (?)

प्रभाकर देवधर

माझे क्षेत्र विज्ञाननिष्ठ तंत्रज्ञाचे. आयुष्यभर मी समाजाच्या प्रगतीला पूरक अशी उच्च दर्जाची इलेक्ट्रॉनिक उत्पादने निर्माण करण्यात मग्न होतो आणि आजही माझ्या मतीने तेच कार्मिक करत आहे. मी, ब्राह्मण घरात जन्मलो तरी, एक प्रकारे त्या विश्वकर्म्याचा वंशजच आहे. तंत्राशी निगडित काम हाच माझा गेल्या साठ वर्षांचा धर्म आहे. विविध गुणधारक व्यक्तींची मदत या कामासाठी मला लागते. त्यांचा धर्म, जात किंवा वय हे असंबद्ध. ध्येय एक हवे. सर्वांच्या ज्ञानाची बेरीज करूनच उच्च दर्जा साधता येतो. आम्हा सर्वांना जोडणारा दुवा म्हणजे मनुष्यधर्म आणि एकमेकांच्या ज्ञानाविषयीचा आदर. गेल्या जवळजवळ ८० वर्षांत विज्ञान आणि धर्म यांविषयीचे माझे विचार स्थिर झाले ते अनुभव आणि वाचनातून. परंतु अध्यात्म तर सोडाच, पण या विषयांचा माझा अभ्यासही अजून खूप मर्यादित आहे, हे मी जाणतो. आपणाला मी प्रथम सांगतो मला माणूस म्हणून घडवणारा माझ्या बालपणातला एक मनस्वी अनुभव.

माझ्या मनुष्यधर्मकेंद्रित विचारांना पक्के केले मला बालपणी आलेल्या एका अविस्मरणीय अनुभवाने. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयातील माझा इंग्रजी दुसरीचा वर्ग. म. मो. बापट सरांचा मराठीचा तास. सर शिकवताना मध्येच थांबले. बाहेरून एक धून कानावर आली. पंढरपुराकडे जाणारी ज्ञानेश्वर माउलींच्या पादुकांची पालखी शाळेच्या दिशेने जवळ येत होती. वारकरी "निवृत्ती-नामदेव-सोपान-मुक्ताबाई-एकनाथ-नामदेव-तुकाराम" असा नामगजर करत नाचत चालले होते. आम्ही खिडकीतून भारून दिंड्या बघू लागलो. त्या पुढे सरल्यावर वर्ग पुन्हा पूर्ववत झाला. बापट सर अजूनही डोळे मिटून स्वस्थ बसले होते. सरांनी डोळे उघडले आणि धडा पुढे सुरू न करता ते म्हणाले, "मुलांनो, सर्वांचे मन रिझवणारी ही संतनामावली नुसती सुरेलच नाही, तर त्यात मनुष्यजन्माच्या आंतरिक प्रवासाची शिकवण अगदी सोप्या शब्दांत गुंफवली आहे." मी त्या वेळी केवळ दहा वर्षांचा होतो; पण ते सारे एखाद्या वज्रलेपाप्रमाणे माझ्या मनावर कोरले गेले. सर म्हणाले, "मुलांनो, यातले प्रत्येक संतनाम ही माणसाला देवत्वाकडे नेणारी एक पायरी आहे. 'निवृत्ती' ही पहिली पायरी. गृहस्थाश्रम नेटकेपणे पार पडल्यावर संसारातून माणसाने निवृत्त व्हावे. 'ज्ञानदेव' ही दुसरी पायरी. ज्ञान म्हणजे मनुष्य- जन्माचा हेतू आणि त्याची इतिकर्तव्यता व सार्थकता यांचा शोध. हे जमले की, पुढली पायरी 'सोपान.' सोपान म्हणजे जिना. तो चढून जाणिवेच्या एका वरच्या स्तरावर पोचायचे. पुढली पायरी 'मुक्ताबाई'. सुखदुःख, आशानिराशा, यशापयश या रस्सीखेचीतून मिळणारी मुक्ती. हीच स्थितप्रज्ञाची अवस्था. अशा मुक्त व्यक्तीसाठी मग सर्वच द्वैतभाव विलीन होऊन जातो. सर्वत्र एकच नाथ दिसू लागतो. ही पायरी 'एकनाथ'! आदिशक्तीचे एकत्व उमजले की, देव ही कल्पना नामापुरती राहते. या पायरीवर उमजते की, नामापुरता देव अर्थात 'नामदेव'!"

बापट सर स्मितहास्य करून पुढे म्हणाले, "अशा देवत्वापर्यंत पोचलेल्या व्यक्तीला मग प्रश्न पडतो, 'तू का राम?' ती देवत्वाची स्थिती माणसाला 'तुकाराम' या अखेरच्या पायरीवर नेते." सारा वर्ग एकटक ऐकत होता. "ही सारी संतमंडळी त्या संत नामावलीच्या क्रमानेच आपल्या जगात अवतरली आहेत हे विशेष. हे सप्तऋषी असे अवतरावे यात आदिशक्तीची योजना असणार, हे नक्की!"

बापट सरांनी दिलेला नामजागराचा विलाक्षण खुलासा आजही माझ्या मनात ताजा आहे. माझे वारकरी पंथातले अनेक मित्रही असा खुलासा त्यांनी कुठेच ऐकलेला नव्हता, असे सांगतात.

विज्ञान-तंत्रज्ञानात पहिल्यापासून रमल्यामुळे आणि घरातही धर्मकांडांचा अभाव असल्याने शाळेतच ब्राह्मणाच्या










अहंकाराविषयी एक घृणा माझ्या मनात निर्माण झाली. ज्ञानदेव आणि तुकाराम यांच्या विचाराने मी भारावून गेलो. मनुष्यधर्म मनात खोलवर रुजला पण सतत 'उत्तरे' शोधणाऱ्या माझ्या वृत्तीमुळे भक्तिमार्ग रुचला नाही अन् त्यात मन रमले नाही.

कॉलेजमध्ये असताना वाटू लागले, मी कल्चर्ड मोती आहे, खरा नाही. जन्माला आलो आणि मातापिता आणि इतर मंडळींनी मला 'बनवायला' सुरुवात केली. माझा धर्म, माझी भाषा हे त्यांनी ठरवले. माझ्या विश्वास-अविश्वाच्या सीमा त्यांनी आखल्या. खरेखोटे याचे कस त्यांनी रुजवले. संघशाखेत हिंदुत्वाचे धडे मिळाले. सारे मला 'घडवत' होते. मी खरा कसा वाढलो असतो? जन्मतःच मला अरबी पालक मिळाले असते, तर मी आज कसा असतो? कदाचित माझ्यातला खरा मी दुसराच कोणी असावा.

हळूहळू वृथा धर्माभिमान ओसरला. वाटले, आत्यंतिक एकांगी धार्मिक विचाराने भारलेले धर्मगुरू त्यांच्या समाजाला मूळ धर्मनिर्मात्यांपासून, त्यांच्या विचारांपासून दूर घेऊन गेलेत. ते स्वतःच्या स्वार्थासाठी, स्वतःचे महत्त्व वाढवण्यासाठी त्यांना अभिप्रेत असलेल्या रूढिबद्ध धर्मवाढीसाठी जन्मतःच त्यांच्या समाजातील लहानग्यांचा बुद्धिभ्रंश करतात. खरेतर साऱ्याच धर्मांचे मूळ माणुसकीच आहे. सांघिक समाजाला शिस्त, संरक्षण आणि दिशा देण्यासाठी हे जरूर आहे. पण साऱ्याच लोकांना या धर्मगुरूंनी विविध धार्मिक रोबो बनवले आहे. सर्वांना आपापल्या धर्मकांडांत गुंतवून ठेवून ते मनुष्यधर्माला टाळू पाहत आहेत. लोकांना अतिरेकी बनवत आहेत. मानवसमाजात विविध धर्मांच्या धर्मगुरूंनी अशा भिंती बांधून माणसामाणसांत द्वेषरोपण केले आहे. जेव्हा लोक म्हणत 'गर्वसे कहो की हम हिंदू है', तेव्हा वाटे, हिंदू कुटुंबात जन्म झाला हा अपघात आहे; त्याचा कसला गर्व? गर्व करणे हेच वाईट. पण गर्वच करायचा असेल तर स्वतःच्या पराक्रमाचा करा. शिवाजी महाराजांविषयी अभिमान असावा; पण महाराजांना आपला अभिमान वाटावा असे आपण आज काय करत आहोत, कसला इतिहास घडवीत आहोत, याचे भान ठेवणे जास्त महत्त्वाचे.

एकविसाव्या शतकात, विशेषतः शिक्षित समाजात जगभरच कर्मठ धार्मिकतेचा जोर ओसरू लागलाय, हे उघड आहे. विज्ञानाच्या प्रगतीबरोबर धर्मगुरूंची समाजावरील पकड सातत्याने ढिली होत आहे. विचारांना प्रगल्भता आली की, माणसे मनुष्यधर्म उमजू शकतात. त्यामुळे आधुनिक सुशिक्षित समाज धर्मकांडांचा अर्थ विज्ञानात लावण्याचा प्रयत्न करू लागला. विचारी विज्ञानप्रेमी लोक धर्म आणि अध्यात्म यांचाही थोडाफार अभ्यास करू लागले. जशी वैज्ञानिक प्रगती होत गेली, तशी विज्ञानाची सीमा रुंदावली आणि वाढत्या अज्ञानाची जाणीव तीव्रतेने वाढू लागली. पर्वत चढून जाताना जशी आपल्या दृष्टीची सीमा रुंदावत जाते, तसेच ज्ञानाचे आहे. विज्ञानाच्या सीमांची जाणीव शेवटी प्रत्येकाला अध्यात्माच्या सीमेवर आणून सोडते, असा माझा स्वतःचा अनुभव आहे.

अठरा-एकोणिसाव्या शतकांत युरोपात विज्ञान-प्रगतीने जोर धरला आणि धर्मगुरू आणि तत्कालीन शास्त्रज्ञ यांच्यात वाद सुरू झाले. समाजावरील आपली पकड नव्याने उपलब्ध होणाऱ्या वैज्ञानिक माहितीमुळे ढिली होण्याची भीती ख्रिश्चन धर्मगुरूंना वाटू लागली. त्यातून वैमनस्य निर्माण झाले. पण तो आता इतिहास आहे. आज शिक्षित समाजातील काही थोडे लोक धर्मबंधांच्या पलीकडे जाऊन अध्यात्माचा स्वतंत्र विचार करू लागले आहेत. पण दुसऱ्या बाजूला विज्ञानक्षेत्रातही मला मोठ्या प्रमाणात लौकिक दृष्ट्या ज्याला 'अंधश्रद्धा' म्हणतात, ती दिसून येते. विज्ञान आपल्याला सतावणाऱ्या अनेक मूलभूत प्रश्नांची उत्तरे देऊ शकत नाही, हे लवकरच समजू लागले. प्रकर्षाने दुसरीही एक जाणीव झाली. फिजिक्स, केमिस्ट्री, बायॉलॉजी वगैरेंची केलेली विज्ञानाची विभागणी कृत्रिम आहे. सर्व वैज्ञानिक ज्ञान अखेरीस एकाच मुक्कामाला पोचते, ज्याच्या पलीकडचे क्षेत्र सध्यातरी (मलातरी) अज्ञात आहे. याची जाणीव झाली की, आपल्याला विज्ञानाच्या पाठपुराव्याच्या सीमा ठळक दिसतात. त्याचबरोबर विज्ञानातील उणिवा आणि त्यातील अज्ञानाच्या सीमाही रुंदावत जातात. अध्यात्माची जाणीव तेव्हा होते. त्याची उत्तरे आज अध्यात्मात शोधण्याची वेळ आली आहे, असे मला वाटते. उदाहरणार्थ, ॲलोपॅथी



अनुक्रमणिका

शरीरशास्त्र बघा. अगदी अलीकडेपर्यंत मनाचा शारीरिक अवयवांवरचा ताबा ॲलोपथ मानायला तयार नव्हते! आजही मनाचे विकार ते केमिकल इम्बॅलन्स समजतात. पाच वर्षांच्या ॲलोपॅथी कोर्समध्ये मानसशास्त्र-शिक्षण पाच दिवसांत संपते! विज्ञानाला आजही मृत्युक्षणी शरीरातून काय बाहेर जाते, याचे पुसटसेही ज्ञान नाही. विज्ञानाचा गर्व करणाऱ्यांना विज्ञानाच्या सीमित प्रगतीची जाण अलीकडे पटू लागली आहे. 'विश्वास' आणि 'श्रद्धा' यांचा अर्थ वैज्ञानिकांना आता पुसटसा उमजू लागला आहे. ज्यांना तो उमजलाय, ते 'अंधश्रद्धा' असा शब्दप्रयोग करण्यास धजावणार नाहीत.

विज्ञानाच्या आजच्या सीमा समजल्या की, जीवनाचे कोडे उलगडण्यासाठी अध्यात्माकडे वळणे अनिवार्य होते. आज मन हे शरीरापेक्षा अतिशय जास्त महत्त्वाचा विषय आहे. अज्ञान अजूनही अफाट आहे. विज्ञान प्रयोगनिष्ठ सिद्धान्त मानते. अज्ञान दूर करण्यासाठी, मनाचे कोडे सोडवण्यासाठी आता वस्तुनिष्ठ प्रयोगासोबत अध्यात्मनिष्ठ अभ्यास करणेही जरूरीचे राहील.

आजही मला जीवनाचे कोडे सुटलेले नाही आणि अज्ञाताचा शोध करणे चालूच राहणार आहे. निसर्ग, विज्ञान मलाही नम्र करते, अज्ञाताची आणि माझ्या मूढतेची जाणीव मला जागे ठेवते. स्वामी विवेकानंद, तुकोबा, ज्ञानेश्वर आदी संतमहात्म्यांकडून मनुष्यधर्माची मिळालेली शिकवण गाठीला ठेवून मी माझा नेहमीचा उत्तरांचा शोध घेण्याचा छंद जोपासत राहणार आहे. त्याच्या पल्लीकडे जाण्याची माझी कुवतही नाही, हे मी जाणतो.

मी अजूनही विज्ञानातील अज्ञान समजावून घेण्यात गुंतलेलो आहे. मला असे वाटते की, सुखी आयुष्यात एखादी मनोबल खच्ची करणारी अनपेक्षित घटना घडली की, अनेक लोक अध्यात्म्याकडे उत्तरांसाठी वळतात. काही अगदी थोडे लोक मानवी जीवनाचा अर्थ जाणण्यासाठी ज्ञानलालसेने अध्यात्माकडे वळतात. मला तसा फटकारा आजवर मिळाला नसावा. पण एका कार्मिक पातळीवर शोध घेणे यात मला सध्या समाधान आहे.

*"The notion that science and spirituality are somehow mutually exclusive does a disservice to both."*

*-- Carl Sagan on Science and Spirituality*

*"Life is but a momentary glimpse of the wonder of this astonishing universe, and it is sad to see so many dreaming it away on spiritual fantasy."*

*-- Carl Sagan*



# धर्म आणि विज्ञान

श्री. मा. भावे

धर्म आणि विज्ञान यांच्यातील संबंध हा मुख्यतः पाश्चात्त्य संस्कृतीमध्ये वेळोवेळी चर्चेचा विषय झालेला आहे. इतर महत्त्वाच्या संस्कृती म्हणजे पश्चिम आशियातील मुस्लिम संस्कृती, भारतीय संस्कृती व चिनी संस्कृती. यांमध्ये १९ व्या शतकापर्यंत तरी धर्म व विज्ञान यांच्यातील संबंधांविषयी काही विचारमंथन होण्याचा मोका आला होता, असे दिसत नाही. १९ व्या शतकात पाश्चात्त्यांचा प्रभाव त्यांच्या साम्राज्यवादी हालचालींमुळे इतर संस्कृतींवर पडू लागला व त्या प्रभावाच्या अनुषंगाने पाश्चात्त्य विज्ञानाशी या संस्कृतींचा परिचय झाला. कोणत्याही धर्माचे तीन स्तर असतात. पायाभूत स्तरावर अध्यात्म असते, उपासनास्तरावर दैवते असतात आणि वरच्या स्तरावर त्या धर्माने घालून दिलेली लोकसंग्रहाची घडी असते. हिंदू धर्माचेही हे तीन स्तर आहेत. आपण इथून पुढे धर्म व विज्ञान यांचा विचार करू, तेव्हा मुख्यतः हिंदू धर्माचे प्रारूप डोळयांपुढे ठेवू.

हिंदुस्थानात इंग्रजी साम्राज्याचा अंमल १९ व्या शतकाच्या सुरुवातीस सर्वत्र पसरला. १८ व्या शतकाच्या अखेरीस व १९ व्या शतकाच्या सुरुवातीस युरोपात एन्लाइटन्मेंट या नावाने ओळखली जाणारी वैचारिक चळवळ उभारी घेत होती. या चळवळीतील एक विचार हा होता की, विज्ञानाच्या साहाय्याने आपण निसर्गनियमांचा शोध घेतला व त्या नियमांचा वापर करून नैसर्गिक शक्तींना आपल्या फायद्यासाठी राबवू शकलो. तीच प्रक्रिया समाजातील ऊर्जा व समाजधारणेचे नियम यांच्या बाबतीतही उपयोगात आणता येईल. तथापि, असा हा शास्त्राधारित समाज प्रत्यक्षात आणण्याला धर्म हा मोठा अडथळा आहे. कारण आजवर समाजाची जी घडी बसली आहे, ती धर्माने घालून दिलेली आहे. एन्लाइटन्मेंटच्या काळातील विचारवंत धर्मावर टीका करीत ती याच कारणाने.

पाश्चात्त्यांचे विज्ञान व एन्लाइटनमेंटने घडविलेले त्यांचे समाजशास्त्रीय विचार या दोन्ही गोष्टी पाश्चात्त्य शिक्षणाच्या माध्यमातून आपल्याकडे आल्या व १८५७ सालानंतर ज्या वर्गाकडे समाजाचे धुरिणत्व गेले, तो पाश्चात्त्य शिक्षणाने मंडित झालेला वर्ग याच दृष्टीने एतद्देशीय समाजाकडे पाहू लागला. त्यातून आपल्या देशात 'सनातनी विरुद्ध सुधारक' अशा स्वरूपाचा झगडा १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात उभा राहिला. त्याची माहिती आपल्याकडील सर्वांना आहेच.

हे सर्व इथे थोड्या विस्ताराने सांगितले त्याचे कारण इतकेच की, धर्म व विज्ञान यांचा जो विचार आपल्याकडे सुरू झाला, त्याची पृष्ठभूमी लक्षात यावी व हेही कळून यावे की, या संबंधाचा विचार पाश्चात्त्य संस्कृतीच्या प्रगतीतील एका विशिष्ट टप्प्याच्या संदर्भात आपणापर्यंत पोचला. त्यापूर्वीदेखील आपल्याकडे धर्म होता व विज्ञानही होते. पण त्यांच्यातील संबंधांविषयी कोणतीच अस्वस्थता आपल्या विचारवंतांत नव्हती.

(१)

विज्ञान व धर्म यांची नेमकी स्वरूपे समजून घ्यायची झाल्यास बराच कापूस पिंजावा लागेल. त्यात वेळ न घालवता आपण प्रथम विज्ञान व नंतर धर्म यांची बांधणी व उद्दिष्टे काय आहेत, हे एकामागून एक समजावून घेऊ.

विज्ञानाच्या संबंधात दोन मुद्दे लक्षात घेतले पाहिजेत. पहिला हा की, विज्ञान व तंत्रज्ञान या परस्परांशी संबद्ध पण परस्परांपासून निराळ्या असणाऱ्या ज्ञानशाखा आहेत. तंत्रज्ञानाचा जन्म विज्ञानाच्या आधी झाला अणि आज-देखील अशी कित्येक उपकरणे आहेत की, त्यांचा उपयोग त्या उपकरणांमागील विज्ञान लक्षात न घेता आपण करू शकतो. उदा., लहान मुलेही सायकल चालवतात; पण सायकलमागील गतिशास्त्र त्यांना अवगत नसते. तीच गोष्ट विज्ञानातील विचारपद्धती व व्यवहारातील विचारपद्धती यांच्या बाबतीत आहे. व्यवहारातील विचारपद्धती, जिला इंग्रजीत कॉमनसेन्स असे म्हणतात,

अनुक्रमणिका

ती व्यवहारात आपल्याला अनुकूल होतील अशा घटना घडवून आणण्यास उपयोगी पडते. पण विज्ञानातील प्रश्न सोडविण्यास निराळ्या विचारपद्धतीचा अवलंब करावा लागतो. याचीही अनेक उदाहरणे देता येतील. विज्ञानाशी निगडित पण विज्ञानाहून वेगळ्या अशा या दोन गोष्टी – तंत्रज्ञान व व्यावहारिक विचारपद्धती – वेगळ्या केल्यानंतर विज्ञानाचे निखळ रूप काहीसे स्पष्ट होते.

विज्ञान हे संकल्पनात्मक असते. विज्ञान ही संकल्पनांची उतरंड रचणारी विचारपरंपरा आहे. एका संकल्पनेपासून विकसित झालेली दुसरी संकल्पना आपण पहिलीच्या वर रचत जातो. यावर असा प्रश्न विचारात येईल की, यात विज्ञानाचे वैशिष्ट्य ते कोणते? अध्यात्मात-देखील आपण संकल्पनांचा व्यूहच मांडलेला असतो. त्यावर उत्तर असे की, विज्ञान हे असे धरून चालते की, मनुष्याचे विचार, भावना, कल्पना यांच्यापासून स्वतंत्र अशी बाह्य सृष्टी आहे. तिचा जो अनुभव प्रत्येकाला येतो, त्यातून ही सृष्टी प्रत्येकाला समजत जाते. इथे हेही गृहीत आहे की, 'अ' ला येणारा सृष्टीचा अनुभव व 'ब' ला येणारा अनुभव यांत फरक असत नाही. 'अ' ला दगड टणक लागतो व 'ब' ला विसविशीत लागतो, असे होत नाही. त्यामुळे 'अ' जेव्हा सृष्टीच्या त्याला आलेल्या अनुभवाविषयी बोलतो, तेव्हा त्याला खात्री असते की, ऐकणाऱ्याला, उदा., 'ब' ला, त्याचे म्हणणे कळते आहे. कारण त्यालाही तसाच अनुभव आला आहे किंवा येण्याची शक्यता आहे. सृष्टी ही अशा रीतीने व्यक्तिसापेक्ष नसून स्वतंत्र व तिऱ्हाईत आहे असे ठरल्यावर आपण सृष्टीविषयी चर्चा करू शकतो, हेही ओघानेच आले. अध्यात्माच्या बाबतीत चर्चा करण्याला जी मर्यादा आहे, तिचा विचार पुढे करू.

आता आपल्याला संकल्पनांचा व्यूह रचण्यामागील विज्ञानाच्या उद्देशाविषयी बोलता येईल. विज्ञानाचा उद्देश संकल्पनांचे जाळे रचून त्यात सृष्टीला पकडणे हा असतो. म्हणजेच सृष्टीचा जो अनुभव आपल्याला येतो, त्याचा खुलासा आपण या संकल्पनांच्या जाळ्याच्या साहाय्याने करू इच्छितो. उदा., वस्तू खाली पडतात, हा आपला अनुभव आहे. 'पृथ्वी वस्तूला आपल्याकडे ओढते', हा त्याचा एक खुलासा झाला. सर्वच वस्तू एकमेकींना आपल्याकडे खेचतात, हे त्याचे सामान्यीकरण झाले. या खेचण्याला आपण गुरुत्वाकर्षण या संकल्पनेत गोवून टाकतो. अनुभवाच्या पुनरावृत्तीतून संकल्पना तयार होतात.

(२)

आपण पाहिले की, संकल्पनांचा व्यूह ही गोष्ट आपल्याला अध्यात्मातही दिसते. आपल्या परंपरेतील 'कर्मवाद' हा विचार घ्या. त्या परंपरेत पाप, पुण्य, पुनर्जन्म, कर्माचे फळ, आत्मा अशा कितीतरी संकल्पनांची जुळणी केलेली आहे. किंवा सांख्य तत्त्वज्ञान पाहा. त्यामध्ये पुरुष, प्रकृती, प्रकृतीतील गुण, पंचमहाभूते, प्रकृतीने केलेली विश्वाची उभारणी, मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वातील मन, बुद्धी, अहंकार इत्यादी घटक व त्या घटकांनी पकडून ठेवलेला आत्मा अशा अनेक संकल्पनांची अभ्यासकाला स्तिमित करून टाकणारी गुंफण केली आहे. ही गुंफणदेखील मनुष्याला येणाऱ्या अनुभवाचा उलगडा करण्यासाठीच घडवून आणली आहे. एक मनुष्य जन्मतःच आंधळेपण घेऊन आला. याचा उलगडा करण्यासाठी कर्मवाद सांगतो की, मागील जन्मात त्याने काही वाईट कर्मे केली होती.

'खाली पडणे' या घटनेचा विज्ञानाने केलेला खुलासा आणि 'जन्मतः व्यंग असणे' या घटनेचा कर्मवादाने केलेला उलगडा यांत काय फरक आहे? व्यंगाचा कर्मवादाने केलेला खुलासा 'आत्मा' व 'पुनर्जन्म' या दोन संकल्पना वापरतो व त्या संकल्पना 'अलौकिक' आहेत. अलौकिक या शब्दाचा खुलासा असा की, 'तर्कशास्त्राच्या नियमांच्या आधारे बुद्धीद्वारा किंवा अनुभवाने वा प्रयोगाने ज्या वस्तूंची तपासणी करता येत नाही अशा वस्तू अलौकिक होत.'

आपण पाहिले की, अध्यात्म, उपासना आणि लोकव्यवहार ही धर्माची तीन प्रमुख अंगे होत. अध्यात्म म्हणजे 'आत्मा' या संकल्पनेला केंद्रस्थानी ठेवून केलेला विचार. 'आत्मा' हे तत्त्व अलौकिक आहे. त्याची तपासणी बुद्धीद्वारा, अनुभवाने किंवा प्रयोगाने करता येत नाही. तीच गोष्ट 'उपासना' या तत्त्वाची आहे. उपासना कोणत्या तरी दैवताची असते व 'दैवत' हीसुद्धा अलौकिक वस्तू आहे. राहिला 'लोकव्यवहार' किंवा 'लोकसंग्रह'. प्रत्येक

धर्म आपल्या अनुयायांसाठी वागणुकीचे नियम ठरवून देतो. ह्या नियमांमुळे तो धर्म मानणाऱ्या समाजाची व्यवस्था म्हणजेच 'लोकसंग्रह' ठरतो. किंबहुना अशी जी संहिता, तिलाच आपल्या परंपरेत 'धर्मशास्त्र' म्हटले आहे. हिंदुधर्म हा आचारप्रधान आहे असे म्हटले जाते; कारण हिंदूंचा आचार धर्मशास्त्राने घालून दिलेल्या नियमांनुसार चालतो. किंबहुना हिंदुधर्माच्या दृष्टिकोणातून धर्माची व्याख्याच अशी करता येईल की, "अलौकिक शक्तींच्या कल्पनेवर आधारलेले व श्रेयस्कर मानलेले मानवी आचरण म्हणजे धर्म होय." श्रेयस म्हणजे व्यक्तीचे, वर्गाचे किंवा समाजाचे हित होय. हे हित अलौकिक शक्तींच्या साहाय्याने प्राप्त होते. सारांश, धर्माची तिन्ही अंगे अलौकिकाच्या कल्पनेवर आधारलेली आहेत; नव्हे, अलौकिकाची कल्पना केल्याखेरीज ती उभीच राहू शकत नाहीत.

(३)

विज्ञान व धर्म या दोन्ही विचारधारांच्या स्वरूपाचे विश्लेषण आपण इथवर केले. त्यावरून असे दिसून येते की, दोघांत विरोध येण्याला फारशी जागा नाही. कोणी अलौकिक शक्ती मानली, तरी त्याला विज्ञानाने अडथळा येतो असे नाही. किंबहुना, आपण जगाला संकल्पनांच्या जाळ्यात पकडून अनुभवाला येणाऱ्या सर्व घटनांचा खुलासा करू शकतो, हा विश्वासदेखील, देकार्तचे तत्त्वज्ञान मानल्यास, अलौकिक शक्तीवर आधारलेलाच आहे. देकार्त म्हणतो की, प्रगल्भता ही संकल्पना मानल्यास आपल्याला सर्वोच्च प्रगल्भ असे मन मानावे लागेल. हे मन ज्याचे आहे, त्याला आपण ईश्वर म्हणू. म्हणजे असे एकतरी मन आहे, ईश्वराचे मन, की ज्याला साऱ्या विश्वाचे ज्ञान आहे. मनुष्य हा ईश्वराचा पुत्र आहे व प्रगल्भ असा ईश्वर आपल्या मुलाला फसवणार नाही. म्हणून मनुष्याने प्रयत्न केल्यास त्याला विश्वातील सगळ्या घटनांचे ज्ञान होईल. देकार्तचे मूळ म्हणजे मी इथे सोपे करून मांडले आहे.

नीतिपूर्ण वर्तन हे अलौकिकाची संकल्पना मानल्याखेरीज शक्य नाही, असे आग्रहाने सांगितले जाते. जर नीतिनियम मोडून वागल्याने माझा मोठा फायदा होत असेल, तर मी नीतीचे उल्लंघन का करू नये? या प्रश्नाला व्यवस्थित उत्तर 'आत्मौपम्य' याच संकल्पनेत आहे. मी आणि दुसरी व्यक्ती, आम्हा दोघांचे आत्मे एकाच परमात्म्याचे भाग आहेत, असे मानल्याखेरीज मी दुसऱ्याचा घास ओरबाडून खाण्यात काय चूक आहे, याचा खुलासा होऊ शकत नाही. बर्ट्रांड रसेलने Free Man's Worship नावाचा निबंध जवळजवळ शतकापूर्वी लिहिला. त्यात त्याच्या लिहिण्याचा रोख असा होता की, विश्वातील घडामोडी ह्या मनुष्याच्या हिताचा किंवा अहिताचा मुलाहिजा न ठेवता होत असतात. त्या वैश्विक घडामोडींचा धसका घेऊन माणसे वावरतील, तर त्यांच्यात साहजिक बंधुभाव उपजेल व मनुष्याची वर्तणूक नीतिपूर्ण होईल. पण विश्वातील ह्या घडामोडी विज्ञानाच्या कक्षेत आल्या आहेत का?

ही गोष्ट खरी आहे की, ज्या घटनांची नोंद अलौकिकाच्या खात्यावर करून आपण स्वस्थ राहत होतो, त्यांपैकी पुष्कळ घटना विज्ञानाच्या प्रगतीमुळे लौकिकाच्या क्षेत्रात आल्या आहेत. लौकिकाचा प्रांत विस्तार पावत आहे व अलौकिकाचा अंमल आक्रसत चालल्याचा भास होतो. पण मुळातील अवकाशच एवढा अपार आहे की, विज्ञान कितीही विकास पावले तरी अलौकिक हद्दपार होईल, अशी शक्यता नाही.



# नैतिक-इहवादाच्या आड येणाऱ्या आस्तिकता नेमक्या कोणत्या?

राजीव साने

राजकीय संदर्भात 'सेक्युलॅरिझम'चा इहवाद हा सरळ अर्थ घेऊन, कायदे बनविताना कोणताही भेदभाव न करणे, अशा स्वरूपात हा प्रश्न सोडविला गेलेला नाही. त्याऐवजी सर्वधर्मसमभाव हा संभ्रम वाढवणारा शब्द रुळला आहे. यावरून जे राजकीय वाद आहेत, ते ह्या लेखाच्यां विषयात घेतलेले नाहीत.

व्यक्तीला स्वतः न निवडलेला संप्रदाय कुटुंबात शिकविला जातोच. यातून थोपल्या गेलेल्या विविध 'आस्तिकता' व्यक्तीलाच स्वतःच्या जीवनसरणीत सामावून घ्याव्या, बदलाव्या वा नाकाराव्याही लागतात. परंतु कडकडीत इहवादी बनणे हे सर्वांना जमतेच असेही नाही आणि कडकडीत इहवादी जीवन हेच सर्वोत्तम मानवी जीवन असते असे खात्रीने म्हणता येते, असेही नाही. सर्वच आस्तिकता या माणसाला सारख्याच प्रमाणात चांगले बनविणाऱ्या किंवा वाईट बनविणाऱ्या असत नाहीत. त्यामुळे विविध आस्तिकतांना वस्तुनिष्ठ आधार कितपत आहे यापेक्षा त्यांचा मूल्यात्मक अर्थ काय होतो, हा प्रश्न जास्त निकडीचा ठरतो. या दृष्टीने नैतिक--इहवाद म्हणजे काय? जडवाद हा नैतिक-इहवादी बनण्याचा एकमेव मार्ग आहे काय? वस्तु-स्वरूप-मीमांसा (मेटॅफिजिक्स) जडवादी नसतानाही नैतिक-इहवादी भूमिका असू शकते काय? हे प्रश्न आपण विचारार्थ घेत आहोत.

नैतिक-इहवाद ही दृष्टी स्पष्ट होण्यात इहवादाला अनावश्यकपणे (व इहवाद्यांच्या काही चुकांमुळेही) चिकटून येणाऱ्या इतर वादांमुळे बऱ्याच अडचणी येतात. हे वाद म्हणजे जडवाद, एकायामीकरणवाद (रिडक्शनिझम), सुखवाद (हेडोनिझम), उपयुक्ततावाद (युटिलिटेरियनिझम), बाह्य-प्रत्यक्ष-वाद (पॉझिटीव्हिझम), साधनमात्रवाद (इन्स्ट्रुमेंटालिझम), विज्ञान-सर्वंकषता (सायन्स शॅल रिप्लेस ऑल फिलॉसॉफी), अहंकेंद्री नीतिशास्त्र (इगोइस्टिक एथिक) इत्यादी. त्यामुळे इहवादी भूमिका घेतली तर मोठेच काहीतरी अंगलट येईल. "मानवकेंद्रिततेतून उन्मत्तताच येते. पवित्र अधिष्ठानाशिवाय नैतिकता टिकत नाही. सुख मिळेल, यश मिळेल; पण शांती कशी मिळेल? मानवी तर्क-बुद्धीच्या मर्यादांचे नेमके काय करायचे?" या व अशा चिंतांमुळे 'इहवाद' स्वीकारायला कित्येकजण धजावत नाहीत.

दुसरीकडे माणसाला 'आत्मिक' स्वरूपाचे काही प्रश्न असतात हे मान्य केले रे केले की, इहवाद बाटलाच (!) म्हणून समजा, असाही एक धसका आहे. आत्मिक साधना ही संस्थात्मक-धर्म-सम्प्रदायांकडेच नेईल किंवा 'पारलौकिक' मानायला भाग पाडेल, ही भीती; ती मानव-कृत न्यायाचे महत्त्व वाटण्यासाठी व टिकण्यासाठी जडवादीच असावे लागते हा अपसमज; वैराग्य, कर्तृत्वशून्यता, बुळचट अहिंसा हे आत्मिक दृष्टीचे अपरिहार्य परिपाक असतात अशी एक उगाचच/किंवा काहीशी साधार खात्री इत्यादी गोष्टींमुळे 'आत्मिक' हा शब्द वापरायलासुद्धा कित्येकजण बिचकतात.

खरेतर इहवाद ही प्रामुख्याने एक व्यापक नैतिक भूमिका आहे. तिच्यात स्वातंत्र्यवादी, समतावादी, इहवादी--समूहवादी, उपयुक्ततावादी अशा अनेक नीती समाविष्ट होऊ शकतात. या नैतिक भूमिकेसाठी एक विशिष्ट (विशेषतः जडवादी) सद्-वस्तु-मीमांसा मान्य करणे अनिवार्य असते, अशी कित्येक इहवाद्यांची ठाम समजूत असते. पण कित्येकदा ईश्वर, आत्मा, पुनर्जन्म वगैरे मानणारे हे नैतिक दृष्ट्या इहवादी असू/बनू शकतात. (कसे ते पुढे मांडणार आहे.) हे संभाव्य नैतिक-इहवादी जडवादाला बिचकून विनाकारण नैतिक-इहवादापासून दूर ढकलले जातात. यामुळे नैतिक-इहवाद पसरावा हे त्यांचे उद्दिष्ट अधिकच असफल होते व अवघड होऊन बसते.

इहवाद नावाचे एक संपूर्ण दर्शन आहे वा मांडले गेलेले आहे, अशातला काही भाग नाही. इहवाद ही

अनुक्रमणिका

मुख्यत: एक नैतिक भूमिका आहे व तदनुषंगिक राजकीय भूमिकाही आहे. त्यापैकी नैतिक भूमिका या लेखात प्राधान्याने लक्षात घेतलेली आहे. ही नैतिक भूमिका विविध दर्शने वा दर्शन-शास्त्रे आधाराला घेऊ शकते. पण असा आधार घेताना कोणतेतरी दर्शन संपूर्णपणे मान्य करावे लागते, असे काही नाही.

जे अगोदरच इहवादी आहेत, त्यांना एकमेकांशी बोलताना समाईक-संज्ञाव्यूह (डिसकोर्स) सापडणे सोपे जाते. परंतु स्पष्टपणे इहवादी म्हणवून घेणारे लोक फारच थोडे आहेत. त्यांनी एकमेकांशी बोलताना कसे बोलावे यापेक्षा त्यांनी 'अन्-इहवाद्यांशी' कसा संवाद साधल्यास नुसतीच तणातणी न होता हा संवाद विधायक होईल व इहवाद्यांचे खरेतर कोणालाही पटण्यासारखे असे नैतिक आवाहन अन्-इहवाद्यांपर्यंत कसे पोचेल व अन्-इहवाद्याच्या मनाला कसे भिडेल, हा खरा प्रश्न आहे. तसेच 'अन्-इहवाद' हेदेखील, एकच एक शुद्ध आणि संपूर्ण दर्शन म्हणून कोणाकडेच उपलब्ध नसते. किंबहुना सामान्य माणसाला दर्शन-शास्त्रीय शिस्त पाळण्याशी फारसे देणे-घेणे नसते. त्याला मिळालेले 'संस्कार' व तुरळक सुटे सुटे विचार एवढ्याच सामग्रीनिशी आणि त्याच्या संदर्भवर्तुळात तो विशोभित न ठरण्याची त्याची मानसिक गरज घट्ट पकडून तो त्याच्या जीवन-प्रसंगांचा अर्थ लावत वा जीवनप्रसंगांना अर्थ देत जगत असतो. त्याला बिचकवून दूर लोटण्याने कट्टर इहवाद्याला आपण कसे कट्टर राहिलो याचे समाधान मिळते, पण इहवादाचा 'प्रकल्प' अजिबात पुढे सरकत नाही; कदाचित मागेच सरकतो. याकरिता इहवाद्यांना आपल्या आस्थेमधील गाभ्याचे मुद्दे कोणते आणि चिकटून आलेले अवांतर मुद्दे कोणते, हे स्पष्ट असायला हवे. तसेच शब्द कोणता वापरला यापेक्षा भाव कोणता व्यक्त झाला, यावर त्याने भर द्यायला हवा. आपले नैतिक मत, जर 'अनिहवाद्याला' (खरे तर अन्-इह-अ-वाद्याला: कारण बहुतेक वेळी हा तसा वादीबिदी नसतोच.) पटणार असेल, तर नैतिक इहवाद्यांना सहसा न आवडणाऱ्या परिभाषेत जरी ते पटले तरी निदान सुरुवात तरी चांगली होईल. म्हणूनच प्रथम इहवादाचे नैतिक आस्था-विषय कोणते हे नोंदवून घेऊ या.

**इहवाद्यांचे नैतिक आस्था-विषय**

१) जबाबदारी टाळणारा पलायनवाद नको.

२) जीवन-विरोधी व आपले 'मानव असणे' हेच कलंकित ठरवणारे वैराग्यवाद नकोत.

३) सफल ठरणारे उपाय बाजूला पडून भ्रामक उपायांत अडकायला नको.

४) कुलाधिष्ठित असे विशेषाधिकार (प्रीव्हिलेजेस) व विशेष-कर्तव्ये (बर्डन्स) कोणालाही मिळता कामा नयेत.

५) कोणाचाही ज्ञान-दावा हा कोणालाही पडताळणीय असायला हवा. म्हणजे दर वेळी पडताळणी केली पाहिजे असे नाही; पण पडताळणी केली जाऊ शकते, याचा धाक दावेदारावर असायला हवा.

६) जे ज्ञान फक्त विशेष व्यक्तींना होऊ शकते, त्याचा उपयोग समाईक ज्ञानासारखा सर्वांसाठी म्हणून करता येऊ नये.

७) कोणतेही मत किंवा उपदेश हा (विनम्रपणे का होईना पण) आव्हाननीय असला पाहिजे.

८) कोणत्याही व्यक्तीला तिचे मत वेगळे आहे एवढ्यावरून बहिष्कृत वा प्रताडित करण्याचा अधिकार समूहाला वा समूहाच्या प्रतिनिधींना असता कामा नये.

९) प्रथा व आन्हिके यांचा व्यावहारिक वा प्रतीकात्मक अर्थ स्पष्ट असायला हवा. या अर्थामध्ये नीतिदृष्ट्या आक्षेपार्ह नेमके काय आहे हे कळून त्यात बदल करण्याचा अधिकार लोकांना असायला हवा.

१०) कोणत्याही व्यक्तीचा 'आध्यात्मिक' अधिकार हा तिला सर्वच विषयांत अधिकारवाणीने बोलण्यास मोकळीक देणारा ठरता कामा नये व आदेश देण्याचा अधिकार तर त्यामुळे नक्कीच मिळता कामा नये.

११) श्रद्धा वाटणे/बसणे आणि श्रद्धा ठेवण्याची सक्ती असणे यांतला फरक स्पष्ट व्हावा व विरोध हा सक्तीला असायला हवा. जी श्रद्धा आपल्याला इतरांवर सक्ती करण्याचा अधिकार किंबहुना कर्तव्य देते, ती श्रद्धा लादणूकवादी आणि म्हणून त्याज्य मानली जायला हवी. एकूणच श्रद्धांचे मूल्यमापन हे त्या नीतिदृष्ट्या कोणत्या प्रकारची कृत्ये करायला प्रवृत्त करतात, यावरून व्हावे; श्रद्धा-विधानांच्या तथ्यात्मक सम्भवशीलतेवरून






(फॅक्ट-क्लेम-प्रॉबेबिलिटी) नव्हे.

१२) सत्कृत्ये ही दुष्कृत्यांना कॅन्सल-आउट करतात असे मानणे हे युटिलिटेरियन (एकूण बेरीज धन आली की झाले असे) तत्त्व आहे. हे तत्त्व नैतिक दृष्ट्या संधिसाधूपणाचे आहे. दुष्कृत्य हे निरपेक्षपणे वर्ज्य हवे.

१३) मानवकृत न्यायात सत्कृत्ये वा दुष्कृत्ये ही ह्या (म्हणजे स्मरणात असलेल्या) जन्मोचीच जमेस धरता येतात. काव्यगत न्याय हे काव्यगत म्हणूनच सांत्वनपर ठरू शकतात; त्यावर दावा सांगता येत नाही, हे स्पष्ट असले पाहिजे.

१४) माणसांचे (वा जमल्यास इतर जीवांचेसुद्धा) हित साधणारी कृत्ये ही पुण्यप्रद वा ईश्वरनिष्ठा व्यक्त करणारी असतात असे मानले तर चालेल. पण याउलट, धर्मगुरूंनी सांगितल्यानुसार औपचारिक आविर्भाव (जेस्चर्स) केले की सत्कृत्य झाले; मग माणसांशी (वा जमल्यास.....) कसेही वागा, ही वृत्ती 'धार्मिक' म्हणून मान्यताप्राप्त होऊ नये.

१५) कोणालाही परके म्हणून, अपवित्र म्हणून, सैतानी म्हणून हन्य ठरविणे असा अधिकार कोणालाच असता कामा नये.

१६) आपल्या 'पारलौकिक उपलब्धी'च्या/शुभतेच्या खुणा या 'या' जगात दिसल्या पाहिजेत. म्हणजे एकूणात 'निःश्रेयस-स्कीम' ही 'अभ्युदय-लिंक्ड' असली पाहिजे.

वरील सूची ही नैतिक इहवादाच्या कोणा एका अधिकृत पीठाने जाहीर केलेली आहे, असे अजिबात नाही. किंबहुना असे एकमात्र 'पीठ' असणे हेच नैतिक इहवादात न बसणारे आहे. मी स्वानुभवावरून व इतर नैतिक-इहवाद्यांची खरी तळमळ काय आहे हे समजावून घेत ही सूची बनविली आहे. तिच्यात फेरफार होऊ शकतात. पण नैतिक-इहवादी आस्थेची एकूण दिशा साधारणपणे तिच्यातून व्यक्त होत असेल, अशी आशा वाटते.

**'पारलौकिक' मानण्याच्या गरजा : सोयीस्कर आणि प्रामाणिक**

काही वेळा चुकीच्या गोष्टींना समर्थन मिळावे म्हणून, जबाबदारी झटकता यावी म्हणून, भौतिक जगातल्या घटनांवर बिगर-भौतिक नियंत्रण मिळावे (निदान तसे वाटावे) म्हणून, दैवी शक्तींकडे वशिला लागावा म्हणून आणि आपण 'विशेष अधिकारी व्यक्ती आहोत' असे दाखवून चक्क सत्ता गाजविण्यासाठी व अशा अनेक 'चतुर' गोष्टींसाठी 'पारलौकिक' मानले जाते. अशा सोयीस्कर 'पारलौकिका'वर फसवणूक करू नये ह्या साध्या तत्त्वानिशी हल्ला करता येतो व तसा केलाही पाहिजे. उदाहरणार्थ, अतींद्रीय शक्ती किंवा सिद्धी याविषयी असे म्हणता येईल की, त्यांचा दावा हा ऐहिक फायदा करून देण्याचाच असतो. तंत्र-विशेषज्ञ जसे आपापल्या ग्राहकाला सेवा पुरवतात तेवढीच या दावेदारांची मजल असते. फसवणूक असेल तर ग्राहक म्हणूनही कारवाई करता येईल. दुसरे असे की, होडी बनविणे इतके सोपे असताना पाण्यावरून चालण्यासाठी उग्र तप हवेच कशाला? चमत्कार दाखवून ग्राहक मिळतात; शिष्य नव्हेत. प्रभावित करून जर कोणी वैचारिक मांडणी पण खपवत असेल, तर त्याला वैचारिकच खंडन हवे. पण स्वतःला फसवून घेण्याचा कोणी निर्धारच केला असेल, तर वादविवादाने फारसे काही साधत नाही. खरीच श्रद्धा आहे ना? मग इतर उपाय थांबवत का नाही? असे पकडता येते; पण त्यातून काठावरच्या केसेसच 'सुटू' शकतात. असो.

पण पारलौकिक मानण्याच्या सगळ्याच गरजा अशा चावट आणि थिल्लर असतात असे गृहीत धरणे म्हणजे मानवाचे काही महत्त्वाचे खरे प्रश्न नाकारण्यासारखे ठरते. जे नैतिक इहवादी अनिहवादाला केवळ कारस्थान समजतात, ते आपण सारीच 'माणसे' असण्यातल्या काही अस्सल (जेन्युईन) पेचांकडे (प्रेडिकॅमेंट्स) काणाडोळा करत असतात. एकूणातच कारस्थानमत (कॉन्सपीरसी थेअरी) हा, श्रेय/दुरितांचे मूळ सर्वच माणसांत असते हे नाकारून, दुष्टांचा संहार केला की झाले असे मानणारा, पोरकट प्रकार असतो. गंभीरपणे नैतिक इहवादाचा प्रसार करायचा झाल्यास पारलौकिक मानायला लावणारी प्रामाणिक कारणे कोणती हे समजावून घेऊन तशा पारलौकिकाने नैतिक दृष्ट्या कसा फरक पडत नाही, हे सिद्ध करण्यावर भर दिला पाहिजे. ''

प्रयत्नवाद अजिबात न सोडतादेखील माणसाला अनेक यादृच्छिक घटितांची शुभाशुभ फले भाग्य म्हणून

उमदेपणाने (एलिगंटली) स्वीकारावी लागतात. त्यात न्याय-बुद्धीचे समाधान होण्याचा प्रश्नच नसतो. भाग्यालाही काव्यगत न्यायात बसवून घेण्यासाठी तो लक्षणार्थाने जे बोलतो, ते तो वाच्यार्थानेही घेऊ लागतो. अर्थातच काव्यगत न्यायाची गरज म्हणून लौकिकाच्या बाहेरचे काही मानावे लागते. अशी कोणतीही गडबड न करता स्वच्छ मानाने भाग्यस्वीकृती थोड्यानाच जमते. ज्या जगात आपण येऊन 'पडलो' आहोत त्याचा ज्ञानात्मक उलगडा नेहमीच अपुरा राहणारा असल्याने, ज्ञात असे समग्र चित्र उभे राहू शकत नसते. कसेही करून काहीतरी समग्र चित्र पूर्ण करावेसे वाटते व अपुऱ्या ज्ञानामुळे मोकळ्या राहिलेल्या जागा कल्पितांनी भरून काढल्या जातात. काहींना तार्किक-सुसंगतीची गरज तीव्रतेने भासते. मग जरी चित्र पूर्ण नसले व जरी पुढील कथा खुली असली, तरी त्यांना असुरक्षित वाटत नाही. असे लोक सहजगत्या इहवादी बनू शकतात. याउलट, सुसंगती नसली तरी चालेल पण समग्रता हवी असा आग्रह असणाऱ्यांना चित्र पूर्ण करणारी कल्पिते, 'सत्ये' म्हणून मानावी लागतात.

आपले स्वतःशीच असलेले संबंध सुधारणे याला 'आत्मिक' प्रकल्प म्हणता येईल. 'मानसिक' या शब्दाने तिऱ्हाईत कोणीतरी आपल्या 'विषयीत्वाचे' (सब्जेक्टहूड) विषय (ऑबजेक्ट) बनवून खुलासे करत आहे, असा भाव आहे. म्हणूनच, आतून जगणाऱ्या विषयीने 'विषयी' राहूनच, स्वतःकडे पाहण्याची दृष्टी बदलणे व वृत्ती बदलणे या साधनेला 'आत्मिक'च म्हटले पाहिजे. स्वतःचा स्वतःशीच असलेला झगडा वा ताण वा दुरावा पूर्ण लोप पावला आहे अशा अवस्था क्वचित लाभू शकतात. अवस्था टिकली नाही तरी वृत्तीत चांगले बदल होतात. इथपर्यंत आत्मावस्था ही कल्पना कोणीही प्रयोग करून पाहून पडताळण्यासारखी आहे व "नाही बोवा, माझ्या बाबतीत असे काहीही घडले नाही," असाही निर्वाळा देण्याचे स्वातंत्र्य आहे. परंतु या अवस्थेला एकदाची आणि कायमची प्राप्त होणारी सद्-वस्तू मानले तर हे प्रकरण इहवादाच्या कक्षेबाहेर जाते. वस्तु-सिद्धीसाठीचे युक्तिवादच या प्रकरणाला पारलौकिकात घेऊन जातात; 'आत्मिक'चे 'आध्यात्मिक' होते. हे प्रकरण या आनंदी आणि जीवनदृष्टी सुधारणाऱ्या अवस्थेपर्यंत न थांबता, विश्वोत्पत्ती, विश्वनियंत्रण वगैरे करणाऱ्या महा-सत्-ते-कडे गेले, तर त्यात संस्थात्मक धर्म-संप्रदाय व त्याचे सामूहिक अहंकार या नको त्या गोष्टी शिरतात व माणूस त्यांत अडकला जातो. परंतु हे कसेतरी करून टाळावे याखातर, माणसाची आत्मावस्थेची ओढच गैर ठरविणे हा मार्ग असू शकत नाही.

थोडक्यात, पारलौकिकाच्या 'सोयीस्कर' गरजांवर थेट हल्ला चढविणे मात्र 'प्रामाणिक' गरजांना (नैतिक-इहवादाला ढळ न पोचू देता) मान्यता देणे असे धोरण नैतिक-इहवाद्यांनी घेतले पाहिजे व दार्शनिक वाद हे या धोरणाने पुढे नेले पाहिजेत. विविध प्रकारच्या आस्तिकांनी ज्या गोष्टींना स्वयंभू अस्तित्व वा प्रामाण्य मानलेले असते त्याच्या सत्-ते पेक्षाही त्यातून नैतिक-अनुतर्किते (मॉरल-इम्प्लिकेशन्स्) काय उद्भवतात यावरून कशाचे आस्तिक्य जास्त किंवा कमी आक्षेपार्ह मानायचे, याचा विचार करणे नैतिक-इहवाद्यांना आवश्यक असते. विशेष म्हणजे अनिहवाद्यांचा आस्तिक्यभाव उद्ध्वस्त न करता त्याचे इहानुकूल आस्तिक्यभावात भाषांतर (पॅराफ्रेजिंग) करता येते. अनिहवाद्यांच्या नैतिक दुष्परिणामांशी रचनात्मक संघर्ष करण्याचे मार्ग शोधले गेले पाहिजेत.

**विभिन्न आस्तिकता/नास्तिकता : विभिन्न गोष्टींचे स्वयंभू-अस्तित्व वा स्वयंभू-प्रामाण्य मानणे/नाकारणे.**

या ठिकाणी 'आस्तिकता' (वा 'नास्तिकता') या गोष्टीचा अनेकवचनी उल्लेख कदाचित चमत्कारिक वाटेल. कारण इंग्लिशमध्ये आ-थेइझम या शब्दाने फक्त 'ईश्वर-नास्तिकता'च व्यक्त होते. सुभाग्याने भारतीय भाषांत अस्ति/नास्ति हे पर्याय व्यापक अर्थाचे आहेत. त्यामुळे नास्तिकतेला पूर्वपद (जसे की ईश्वर-) लावून आपण, एखादी नास्तिकता कशाचे (स्वयंभू) अस्तित्व/प्रामाण्य नाकारते (किंवा निदान अप्रस्तुत मानते) हे व्यक्त करू शकतो व अशा जोडशब्दांनी आपण त्या त्या नास्तिकतेचे नामकरण करू शकतो. जसे की वेद-नास्तिकता, यज्ञ-नास्तिकता, ईश्वर-नास्तिकता, आत्मा-नास्तिकता, पुनर्जन्म-नास्तिकता इत्यादी... यामुळे विविध 'आस्तिक' कशाचे अस्तित्व/प्रामाण्य मानतात (वा विविध नास्तिक मानत नाहीत) हे जाणून घेण्यासाठी एक विस्तृत






पटच विचारासाठी खुला होतो. जसे की संवेदनाच खऱ्या अर्थाने 'असतात', त्यांवरून अनुमित केलेल्या जडवस्तूंना, स्वतःचे असे अस्तित्व नसते असे मानणारी भूमिका जे कोणी घेतात (उदा., ह्यूम), त्यांचे वर्णन आपण संवेदना-आस्तिक पण जडवस्तू-नास्तिक असे करू शकतो. ह्यूम काही जड-वस्तू नसतातच असे म्हणत नाही, तर संवेदना या सद्-वस्तू आहेत व जड-वस्तू या त्यांची प्रत्ययरूपे आहेत, असे म्हणत असतो. अगदी ईश्वर--नास्तिकालासुद्धा मनुष्यनिर्मित ईश्वराचे अस्तित्व नाकारता येत नाही. तो 'स्वयं-मात्र' ईश्वराचे अस्तित्व नाकारत असतो किंवा निदान ते अज्ञेय मानत असतो. जडवादी माणूस जाणिवेचे अस्तित्व तर नाकारूच शकत नाही; पण तो जाणिवेचे अस्तित्व स्वयंभू मानत नाही. जड-जग हे त्याच्यासाठी स्वयंभू असते व जाणीव हा जडाच्या जटिल संघाताचा (मेंदू इत्यादी) उद्भूत-गुण असतो. या अर्थाने जडवादी हा चित्-नास्तिक असतो.

पुनर्जन्म-आस्तिकांना आत्म्याचा पुनर्जन्म अधिकृतपणे मान्य असतो; पण अहंकाराचा पुनर्जन्म होतो का, या प्रश्नावर ते गोंधळात असतात. नैतिक--इहवादाच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो तो अहंकाराचा पुनर्जन्म. अहंकाराचा पुनर्जन्म होत असल्याचे नुसते दावेसुद्धा अगदीच अपवादात्मक व संशयास्पद असतात. असे असताना आत्म्याच्या पुनर्जन्मावरचे वाद हे नैतिक दृष्ट्या निरुपयोगी असतात. म्हणूनच पुनर्जन्म-आस्तिकता म्हटल्यावर ती आत्मा या पदार्थाची आहे की अहंकार या पदार्थाची, हा प्रश्न प्रथम उपस्थित केला पाहिजे. कडवे इहवादी हे आस्तिकता या शब्दालाच बिचकल्याने नेमकी कसली आस्तिकता हे पाहण्याच्या संधीच सोडून देतात. स्पष्टता नसणे ही गोष्ट नैतिक-अन्-इहवाद्याला सोयीचीच असते. नैतिक इहवादी मात्र अशा गोष्टी स्पष्ट न केल्यास आपला वाद मांडण्यात कमी पडतो. म्हणूनच आस्तिकता या शब्दाला अमुक-आस्तिकता असे पूर्वपद लावण्याचे धोरण मी पुरस्कृत करत आहे.

प्रामाण्याचेही असेच आहे. शब्दप्रामाण्य न मानणारे, व्यवहारात शब्दांवर विश्वास ठेवूनच जगत असतात. परंतु कोणाचे शब्द विश्वसनीय मानायचे, याचा निर्णय प्रत्यक्ष, अनुमान वगैरे इतर साधनांनिशी करत असतात. वेद-प्रामाण्य मानणाऱ्यांच्या दृष्टीने वेद-वाक्ये ही स्वयंभूपणे प्रमाण असतात. त्यांना क्रॉस-चेक करून पाहणे हा प्रश्नच वर्ज्य असतो. (अर्थात त्यांचे अर्थ लावण्यात भरपूर वैविध्यही दिसते.) विविध 'प्रमाणे' म्हणजे खरेतर निरनिराळ्या ज्ञानरीती किंवा ज्ञानसाधने असतात. तसे पाहिले तर कोणतेच प्रमाण एकट्याने यथार्थतेची पूर्ण हमी देऊ शकत नसते. एखाद्या ज्ञान-प्रस्तावावर (नॉलेज-क्लेम) अनेक प्रमाणांचा संपात होणे हे 'प्रमाण' असते. पण हा एक मोठा आणि स्वतंत्र विषय आहे.

**भारतीय दर्शनांविषयीची काही निवडक निरीक्षणे**

एखाद्या (प्रस्तावित) सद्वस्तूचे अस्तित्व नाकारण्यापेक्षाही अस्तित्व-नास्तित्व हे अप्रस्तुत ठरविणे हे तर अधिकच 'इहवादी' ठरते. कारण मानवी व्यक्तींची भावविश्वे आणि त्यांतील समाईक व एकमेकांना आकलनीय ठरणारा प्रांत या गोष्टींना केंद्रस्थानी ठेवून वस्तुविषयक दावे गौण मानणे हे इहवादाचे खास धोरण आहे. भगवान बुद्धांनी 'अव्याकृते', म्हणजे जे प्रश्न विचारणेच चुकीचे आहे, सांगितलेली आहेत. जगाला आदी/अंत आहेत की ते अनादी-अनंत आहे? जीव व शरीर हे दोन्ही एकच आहेत की भिन्न आहेत? मृत्यूनंतर किंवा जन्मापूर्वी (तथागत म्हणजे खुद्द बुद्ध; पण येथे कोणीही असा अर्थ अभिप्रेत आहे.) 'आपण' असतो की नसतो? हे प्रश्न त्यांनी न विचारण्याचे म्हणून घोषित केले. ही गोष्ट अगदी सणसणीतपणे इहवादी आहे! त्याच वेळी बौद्ध तत्त्वज्ञान हे तृष्णा-मुक्ती किंवा 'निर्वाण' हेच एकमेव अंतिम साध्य मानते व त्यामुळे सर्व पुरुषार्थांच्या संदर्भात ते इहवादी नाही, असेही म्हणता येते. अर्थात 'मध्यममार्गी' असण्यावर जोर दिलेला असल्याने आत्यन्तिकता टाळलेली आहे. परंपरेने बौद्ध दर्शनाला 'नास्तिक' दर्शन हे जे नाव दिलेले आहे, त्यात मात्र वेद-प्रामाण्य-नास्तिकता अभिप्रेत आहे. बौद्ध दर्शनात निरीश्वरवादही आहेच. पण परंपरेत एकदा वेद-प्रामाण्य मानले की, निरीश्वरवादी दर्शनालासुद्धा 'आस्तिक' मानले जाते. जसे की सांख्य-दर्शन. इतकेच नव्हे तर जी निरीश्वरवादीही आहे आणि पुरुषार्थांच्या अंगाने जी चक्क सुखवादी आहे अशी याज्ञिक जीवनदृष्टी (जिचे दर्शन पूर्व-मीमांसा म्हणून प्रसिद्ध आहे), तिला परंपरेने, केवळ

वेद-प्रामाण्य या आधारावर आस्तिक मानलेले आहे. यज्ञ, मंत्रशक्ती या गोष्टी ज्ञानमीमांसेच्या अंगाने इहवादी नाहीत; कारण पडताळणीयता व ज्ञान-दाव्यात मक्तेदारी नसणे या इहवादी अटी त्यात मोडल्या जातात. तरीही जीवनोद्देश म्हणून, ज्यांना आपण आज नैसर्गिक म्हणतो अशा शक्तींना वश करून घेणे व सुखप्राप्ती करणे, अशी युटीलिटेरियन धारणाच त्यात आहे. यात स्वर्गप्राप्तीही आहे. स्वर्ग ही गोष्ट जरी 'पारलौकिक' वाटली तरी तोही एक लोकच आहे व देव हेही जीवच आहेत. म्हणजेच परमतत्त्व शोधण्याची बात नाही. एकूणच भारतीय दर्शनांत ईश्वराला, धक्कादायक वाटेल इतके, कमी स्थान आहे. बौद्ध, जैन, चार्वाक ही दर्शने उघडच निरीश्वरवादी आहेत. सांख्यांत ईश्वर नाहीच. योग या दर्शनातला ईश्वर हा जगन्नियंता वगैरे नाही; तो केवळ अनेकांपैकी एक पण 'आदर्श आत्मा' आहे. न्याय-वैशेषिक या जोडीतला ईश्वर हा अनवस्था टाळण्यासाठी आदिकारण मानावे लागते या थाटाचा म्हणजे न्यूटन व देकार्तच्या ईश्वरासारखा बुद्धिगम्य जग निर्माण व सुरू करून देऊन बाजूला राहणारा (ज्याला थेइझम न म्हणता डेईझम म्हणतात अशा भूमिकेतल्यासारखा) आहे. शांकरमता-नुसारच्या अद्वैत वेदांतात पारमार्थिक सत्तेत ईश्वर नाहीच; तोही मायेनेच भासतो. जे द्वैती आचार्य आहेत, त्यांच्या मतात मात्र ईश्वर हा सत् आहे. वैदिक-श्रमण-भक्ती या त्रिकुटातील भक्तीचा भाग द्वैती-आचार्यांच्या संप्रदायांत प्रधान ठरेल, हे उघड आहे. या त्रिकुटाच्या मिश्रणांच्या विविध परंपरांना आणि स्थानिक लोक-परंपरांना मिळून हिंदू असे अरबी नाव आहे, हे ध्यानात ठेवले पाहिजे. वेदांमधला याज्ञिक कर्मकांडाचा भाग आणि काव्यात्मक-तत्त्वचिंतनाचा भाग हे वेगळे आहेत. दुसरा भाग हा उपनिषदांमध्ये येतो. उपनिषदांची संगती लावून सारार्थ काढण्याचे प्रयत्न निरनिराळे आचार्य करत आलेले आहेत. शांकरमत हे त्यांपैकी केवळ एक आहे. ते म्हणजेच अधिकृत हिंदूधर्म असे मानणे हे अजिबात अनिवार्य नाही. किंबहुना शांकरमतासकट इतरही वेदांती दर्शनांचे खंडण करून उपनिषदांच्याच आधारे पूर्णवादाचार्य डॉ. रामचंद्र प्रल्हाद पारनेरकर महाराज यांनी आपल्या 'पूर्णवाद' या ग्रंथात (विमल प्रकाशन, ५ मालती कॉम्प्लेक्स, पौड रोड, पुणे २९) जग हे सत् तर आहेच पण ईश्वराचेच एक स्वरूप-अंग आहे व जगाला 'कार्य' समजणे ही 'मूलमें भूल' कशी आहे, हे विशद केलेले आहे. नैतिक-इहवादाला उपनिषदांतही कसा भक्कम आधार आहे हे ज्यांना पहायचे असेल, त्यांनी हा ग्रंथ वाचलाच पाहिजे. तसेच पूर्वतयारी म्हणून किंवा एरवीही, उपनिषदांवर श्रद्धा असो वा नसो, डॉ. श्रीनिवास दीक्षित यांचा 'भारतीय तत्त्वज्ञान' (फडके प्रकाशन, कोल्हापूर व मुंजाबाचा बोळ, नारायण पेठ, पुणे) हा ग्रंथ तरी किमान वाचला पाहिजे.

त्याचे असे आहे की, सामान्य माणूस जरी स्वतः शास्त्रचर्चा करू शकत नसला तरी ती करण्याचा दम इहवाद्यांच्यात नाही, ही बातमी मात्र बऱ्यापैकी 'फुटलेली' आहे.

**विविध ईश्वर-स्वरूपांच्या (आपापल्या) उपासकांकडून अपेक्षा व त्यांनुसार घडणाऱ्या उपासकांच्या वृत्ती.**

सर्वच ईश्वर-आस्तिक हे ईश्वराचे अस्तित्व स्वयंभू मानतात. हे 'ईश्वर-आस्तिक'च्या व्याख्येनेच सिद्ध आहे. नैतिक इहवादाच्या दृष्टीने ईश्वराच्या अस्तित्वाचा प्रश्न महत्त्वाचा नसून त्याच्या स्वरूपाचा प्रश्न महत्त्वाचा आहे. अपरिपक्व इहवादी हे अस्तित्वाच्या प्रश्नात अडकून "इलेक्ट्रॉन तरी डोळ्याला कुठे दिसतो", अशा छापाच्या बाष्कळ विवादात वेळ वाया घालवतात. मुद्दा ईश्वर असण्यातून नैतिक-अनुतर्किते (मॉरल-इम्प्लिकेशन्स्) कोणती निष्पन्न होतात, हा आहे. आणि हा मुद्दा अस्तित्वावर अवलंबून नसून मानलेल्या 'स्वरूपावर' अवलंबून आहे. मानलेले स्वरूप अस्तित्वात आहे की नाही, हे सिद्ध/असिद्ध करण्यापेक्षा (जे मानवी बुद्धीला एवीतेवी अशक्यही आहे.) ईश्वर खऱ्या अर्थाने 'ईश्वर' ठरण्यासाठी तो स्वरूपाने कसा असणे स्वाभाविक आहे, यावर वाद घालण्यात हशील आहे. कारण तो काय मागण्या करतो/आदेश देतो, यावर उपासकांचे आचरण (अंशतः तरी) अवलंबून असणार आहे.

उदाहरणार्थ, कॅलव्हिनिस्ट प्रॉटेस्टंट पंथात ईश्वराशी चर्चद्वारा संपर्क साधण्यात अर्थ नाही; आपण तारित (साल्व्हड) आहोत किंवा कसे, याच्या खुणा आपल्याला

या जगात दिसल्या पाहिजेत; त्यासाठी काटकसरीने राहून श्रम-उद्योग जास्त केले पाहिजेत, अशी धारणा होती व या धारणेचा औद्योगिक क्रांतीत मोठा वाटा होता असे मत म्हणे समाज-शास्त्री मॅक्स वेबरने नोंदवलेले आहे.

तसेच पारशी (झरत्रुष्ट) संप्रदायाच्या विचारातला ईश्वर हा मंगल-कारक (बेनेव्होलंट) आहे; पण सर्व-शक्तिमान (ऑम्निपोटंट) नाही. त्याला मानवांच्या मदतीची गरज आहे. (केशवसुतांचे "देवांच्या मदतीस चला तर" आठवते.) पारशी लोकांची कर्तृत्वशीलता आणि उदारता कोठून येते, याचे हे एक उत्तर असू शकते. एकूणच ईश्वराच्या स्वरूपाबाबत जास्त वादग्रस्त मुद्दा सर्व-शक्तिमानता हा आहे. जर तो मंगल-कारक आणि सर्व-शक्तिमान असा दोन्ही आहे, तर जीवांना एवढे दु:खभोग का? हा प्रश्न ईश्वर-आस्तिकांना सर्वांत जास्त अडचणीचा प्रश्न असतो. जीवांचे 'पापमय पूर्वकर्म' त्यांच्या पदरी दु:खभोग टाकते असे जरी मानले, तरी पापांचा आरंभ कशामुळे झाला हा प्रश्न राहतोच. 'माया' 'अविद्या' या अनादी असल्याने म्हणा किंवा अन्य कोणत्याही पारलौकिक कारणांनी (जसे की आदिम पतन) म्हणा, जीवांना पाप-बुद्धी होणे व त्यातून निर्माण होणारी पुढील अनर्थ-परंपरा ईश्वरही टाळू शकत नाही, हे मान्य करावे लागते. या दृष्टीने पाहता त्याच्या सर्व-शक्तिमानतेला ढळ पोचतो. बरे, पाप-बुद्धी ही ईश्वरानेच दिली असे मानले, तर ईश्वराच्या मंगल-कारकतेलाच ढळ पोचतो. मंगल-कारकता नाकारणे म्हणजे त्याचे उपास्य वा आराध्य स्वरूपच नाकारणे ठरते. त्यामुळे सर्व-शक्तिमानता नाकारणेच परवडण्यासारखे आहे. सर्व-शक्तिमानता नाकारल्यास इहवादी नीतीला व मानव-निर्मित न्यायाला वाव व महत्त्व असल्याचे सकारात्मकपणे मान्य करावे लागते.

याखेरीज ईश्वर मानण्याने येणारे कूटप्रश्न सोडविण्यासाठी सर्वेश्वर-वाद (पॅन-थीईझम) हाही एक मार्ग आहे. त्यानुसार सर्वकाही ईश्वराच्या आतच चालू आहे असे होते व हे इहवादाला पूरकच आहे. इतकेच नव्हे तर अनीश्वर, अपवित्र वा सैतानी असे काहीच उरत नाही व त्यामुळे ईश्वराच्या नावाने कोणीतरी उठून कोणाचे तरी निर्दालन करणाऱ्या हिंसक-निष्ठेला वावच उरत नाही. ईश्वरच त्याच्या लीलेची दु:खे आतून भोगतो, रोखतो व निवारतो. हे तो स्वत:च्या जीव या स्वरूप-अंगाने करत असतो, अशी दु:खाची व्यवस्था लागते. दु:खांचा गुणाकार न होऊ देण्याची विवेकशक्ती हे त्याचेच वरदान ठरते. जगात निरीश्वरवादी लोकही असणे याबाबतही "हे तो श्रींची इच्छा" असेच होते. आंतर-सांप्रदायिक द्वेष व हिंसा पृथ्वीतलावरून नष्ट व्हायची असेल तर ईश्वर-नास्तिकतेपेक्षाही सैतान-नास्तिकता किंवा अपवित्र-नास्तिकता (निहिलिटी ऑफ द प्रोफेन) जास्त महत्त्वाची आहे.

भगवान ओशो म्हणत असत, "तुम जैसे हो वैसेही उसको प्रिय हो! तुम 'अच्छे' मत बनो! तुम 'तुम' बनो. तुम वो बनो कि जिसके लिये यहां आये हो. वही ढुंढो की तुम्हारा अपनापन क्या है." आता यापेक्षा इहवादी काय असणार?

ईश्वराच्या आपल्या उपासकांकडून काय अपेक्षा असतात यावर त्यांच्या वृत्ती अवलंबून असतात. हे लक्षात घेतल्यावर विविध ईश्वर-स्वभावांत एक महत्त्वाचा भेद करता येतो. तो असा की, ईश्वरनिष्ठा व्यक्त करणे हे एक (किंवा एकमेव) सत्कृत्य ठरते की, सत्कृत्य करण्यातून खरी ईश्वरनिष्ठा व्यक्त होते? (व सत्कृत्य कोणते हे स्वतंत्र प्रमाणावर ठरते). महात्मा गांधीजींनी ही दिशा उलटविणारी, "सत्य ही ईश्वर है" ही भूमिका नेमकेपणाने घेतली होती. उपासना हे कर्तव्य नसून कर्तव्य ही उपासना आहे. फर्जसे इबादत होती है; इबादतसे फर्ज नही. अमुक-ईश्वर हा त्याच्या निष्ठावानांसाठी एक न्याय व बिगर-निष्ठावानांसाठी दुसरा न्याय असे करतो की माणसे एकमेकांशी कशी वागतात यावरून त्यांचे मूल्यांकन करतो? अशा प्रकारे निष्ठा/सत्कृत्य क्रम उलटविणे ही 'धर्मप्रांता'तली नैतिक-इहवादी क्रान्ती होय.

वेगळ्या शब्दांत सांगायचे तर ईश्वरवादाने नैतिक प्रांतात निर्माण केलेला एक मोठा दोष असा की, माणूस स्वत:ची कामे ईश्वराकडून करून घ्यायची व जणू त्या बदल्यात ईश्वराची कामे स्वत:कडे घ्यायची, असा अव्यापारेषू व्यापार करू लागतो. जे माणसाला शक्य आहे व विहित आहे ते 'त्याच्या'वर सोडायचे आणि जे अशक्य आहे आहे वा निषिद्ध (इहवादी नैतिकतेनुसार)

आहे, ते 'त्याच्या नावे' करायला जायचे. आपले काम आपण करू; त्याचे काम त्याला करू द्या, एवढी भूमिका घेतली की आस्तिक्यभाव न गमावता इहवादी नैतिकता जोपासता येते. तो आपली परीक्षा घेत असतो असे मानले, तरी चांगला गुरू हा जो विषय शिकवायचा त्याच्यात परीक्षा घेईल. शिष्य 'गुरुसेवा/गुरुस्तुती' किती करतो, यावरून त्याचा रिझल्ट लावणार नाही! नैतिक परीक्षेस उतरले की, ते पुरेसे आहे. आस्तिकता उद्‌भवणे हे त्याच्या कृपेवर आहे. नास्तिकांना मारूनमुटकून आस्तिक करा, हे आस्तिकांचे काम नाही.

माणूस सर्वत्र सौदेबाजी करायला शिकला की, तो त्यापासून ईश्वरालाही सोडत नाही. पाप रद्द करून घेण्याच्या बदल्यात पूजा हे पूजेचे भ्रष्ट रूप आहे. ईश्वर असो वा नसो; आपण त्याला भ्रष्ट सरकारी अधिकारी समजतो. हे करून आपण त्याचा अधिक्षेपच करत नाही काय? ईश्वराच्या चांगलेपणाला बाधा येईल असे त्याला कल्पिणे हे नेहमीच चूक आहे. नसला तर नसेलही; पण असला तर चांगलाच असेल, ही श्रद्धा दृढ असायला हवी. ईश्वराचे चित्रण स्तुतिपाठकांची धन करणारा व आक्षेपकांची कत्तल करणारा झोटिंगशहा असे करणे हे ईश्वर-आस्तिकाला तर मुळीच शोभत नाही व ईश्वर-नास्तिकाला कसेच चित्रण करण्याचा हक्कही नसतो व प्रश्नही नसतो. म्हणूनच ईश्वर-आस्तिकता ही शुभस्वरूप/प्रेमस्वरूप-आस्तिकता असली पाहिजे. आणि मग अशी शुभस्वरूप/प्रेमस्वरूप-आस्तिकता आणि नैतिक इहवाद यांच्यात संघर्ष निर्माण होण्याचे काहीच कारण नाही. ☯☯☯



अनुक्रमणिका

# विनोबांचे धर्म व विज्ञानविषयक विचार

वि. प्र. दिवाण

व्यासपीठावरील मान्यवर व उपस्थित अभ्यासक- 'धर्म व विज्ञान' या विषयावरील चर्चासत्रात मला बोलण्याची संधी दिल्याबद्दल 'प्राज्ञपाठशाळामंडळा'चे मी आभार मानतो व मूळ विषयाकडे वळतो.

धर्म व विज्ञान यांवर विनोबांचे स्वतंत्र चिंतन आहे. उपस्थित अभ्यासकांनी यापूर्वी ते वाचले असेलच. तरीही या चर्चेच्या निमित्ताने विनोबांच्या या विषयावरील विचारांची नव्याने उजळणी करू इच्छितो, जेणेकरून चर्चेच्या केंद्रबिंदूत विनोबांचे विचार यावेत.

**धर्म :**

मानवी जीवन ज्या नीतिविचारावर आधारलेले असते, त्याला विनोबा धर्म म्हणतात.

समाजाला त्याच्या आजच्या स्थितीतून आदर्शाकडे घेऊन जाण्याकरिता श्रद्धा, सत्य, प्रेम व त्याग ही धर्माची चार पायाभूत तत्त्वे विनोबांनी सांगितली आहेत. या तत्त्वांच्या अभावामुळे जीवन छिन्नविछिन्न होते, असे विनोबांचे म्हणणे आहे.

प्रचलित धर्मांना विनोबा 'फेथ' म्हणतात. एखाद्या संताला सत्य-प्रेमाचा साक्षात्कार होतो व अशा साक्षात्कारी महापुरुषावर जे लोक श्रद्धा ठेवतात, ते त्या 'फेथ' चे झाले. विनोबांच्या दृष्टीने आजचे सर्व धर्म हे धर्म नसून पंथ आहेत.

**खऱ्या धर्माची स्थापना**

ज्याच्या विरोधात जाण्याची कोणालाच इच्छा होणार नाही, अशा खऱ्या धर्माची स्थापना अजून झालेली नाही; कारण सर्वच धर्म मानसिक भूमिकेवर राहिलेत. म्हणून विनोबा सांगतात—

'आता धर्म जेव्हा विज्ञानाच्या भूमिकेवर येईल, तेव्हाच खरा धर्म बनेल. कारण विज्ञानयुगात व्यापक भावनाच टिकेल. संकुचित भावना टिकणार नाही. बुद्धीच्या कसोटीवर कसला जाणारा, मानसिक कल्पना-कामना इत्यादींच्या वर गेलेला व जगातले सगळे भेदभाव– उपासनेसकट सर्व भेदभाव — काढून टाकणारा धर्मच यापुढे टिकेल. आज आपण संपूर्ण जगाला एक करण्याची गोष्ट करीत आहोत, तेव्हा ह्या सर्व पंथांना आता सिद्ध करायचे आहे. आणि त्यांच्या जागी अध्यात्माला आणायचे आहे.'

**धर्म आणि अध्यात्म**

विनोबा धर्म व अध्यात्म यांत फरक करतात. धर्म बाह्य गोष्टींसाठी आदेश देतो. धर्मात सामान्यतः परमार्थ-दर्शन, उपासनापद्धती, कथा, कायदे व नीती या पाच गोष्टी असतात व स्थल-कालानुसार धर्माच्या या पाच गोष्टी व धर्मही बदलत असतो. मात्र अध्यात्म सर्वत्र एकच असते. विनोबांनी अध्यात्माची सुटसुटीत व्याख्या, सत्य-प्रेम-करुणा अशी केली आहे.

विनोबांनी अध्यात्माचे पाच अंश थोडक्यात सांगितले आहेत, ते असे – (१) निरपेक्ष नैतिक मूल्यांवरील श्रद्धा, (२) जीवनाची मरणोत्तर अखंडता, (३) प्राणिमात्रांची एकता व पावित्र्य, (४) विश्वात व्यवस्था व बुद्धी असणे आणि (५) पूर्णतेच्या अनुभवाची संभवनीयता.

**अध्यात्म आणि विज्ञान**

विनोबा निःशंकपणे व आत्मविश्वासपूर्वक म्हणतात की, यापुढे राजनीती व धर्मपंथ नष्ट होतील व फक्त अध्यात्म व विज्ञान टिकणार आहेत. हे दोघे मिळून जोडण्याचे काम करू शकतात व म्हणून अध्यात्म व विज्ञान यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.

विज्ञान नीतिनिरपेक्ष आहे व जर विज्ञानाची जोड राजनीतीला मिळाली तर सर्वनाश अटळ आहे. म्हणूनच विज्ञानाला मूल्याची व अध्यात्माची आवश्यकता आहे, असे विनोबांचे सांगणे आहे.

ते गणिती भाषेत सूत्रमय पद्धतीने समजावतात –

राजनीती + विज्ञान = सर्वनाश

अध्यात्म + विज्ञान = सर्वोदय

**विज्ञानयुगाची दोन लक्षणे**

सृष्टी अगर प्रकृती ह्यात जे चालले आहे, त्याच्या नियमांचे जे शोध घेते, त्याला विनोबा विज्ञान म्हणतात.

अनुक्रमणिका






विनोबांनी विज्ञानयुगाची दोन मुख्य लक्षणे नोंदविली आहेत. आज माणूस इतर ग्रहांशी संपर्क साधू इच्छितो. म्हणजे एका बाजूला माणूस ह्या विराट सृष्टीचा वेध घेण्यास प्रयत्नशील आहे, तर दुसऱ्या बाजूस सूक्ष्म अणूच्या शक्तीचे आकलन करण्याच्या प्रयत्नात आहे. विराट आणि अणू दोघांचा वेध घेण्याची वृत्ती या अभिनव युगात आहे. विनोबा या अभिनव युगाला 'अपार्थिव विज्ञानयुग' असे म्हणतात.

**वैज्ञानिक भौतिकवाद आणि ब्रह्मवाद**

विनोबा म्हणतात, 'आज वैज्ञानिक भौतिकवाद आणि ब्रह्मवाद ह्या दोहोंमधील अंतर फार कमी झाले आहे. दोन्ही अगदी एकमेकांच्या जवळ आले आहेत. परंतु ह्या दोहोंमध्ये एक मूलभूत फरक आहे. विज्ञान हे सृष्टीला जड मानते, तर ब्रह्मवाद सृष्टीला चेतन मानतो. ब्रह्मविद्या सांगते की, समस्त विश्वात चेतनच चेतन आहे व त्याचे दर्शन हाच आमचा प्रमुख उद्देश आहे.'

वैज्ञानिक भौतिकवाद व भौतिकवाद यांत विनोबा फरक करतात. समाजाशिवाय फक्त स्वतःची चिंता करणे हा भौतिकवाद आहे. आपले मन आणि हे जग, ही जी माणसाच्या जीवनात दोन अंगे आहेत, त्यांतील प्रमुख कोणते व गौण कोणते, हे वैज्ञानिक भौतिकवाद समजावून सांगतो

विनोबा म्हणतात, 'समस्त विश्वात चेतनच चेतन आहे. आत्म्याची एकता व सृष्टीची चेतनमयता ह्यांवर विश्व आधारित आहे. हीच ब्रह्मविद्या आहे. मला विश्वास आहे की, भारताची ही सर्व ब्रह्मविद्या विज्ञानाद्वारे खरी सिद्ध होणार आहे. विज्ञान प्रत्यक्ष प्रयोगाने आणि अनुभवाने सिद्ध करून दाखविते की, सृष्टीत सर्वत्र ब्रह्मतत्त्व भरलेले आहे. वैज्ञानिक भौतिकवादही ब्रह्मवादाचे समर्थन करील, असे मला वाटते.' विज्ञान अणूपासून ब्रह्मांडाच्या दिशेने जाण्याच्या ऐवजी ब्रह्मांडाकडून अणूच्या दिशेने येत आहे. म्हणून ब्रह्मवादाच्या दिशेने जाण्यात विज्ञानाला वेळ लागत आहे.

**समान तत्त्व**

विनोबांना विज्ञान व अध्यात्म यांत सत्याचा शोध घेणे हे समान तत्त्व दिसते. विज्ञान बाह्य प्रमाणाने शोध घेते, तर अध्यात्म आंतरिक प्रतीतीने शोध घेते.

मनुष्याने मनाच्या वर उठले पाहिजे, असे अध्यात्म व विज्ञान दोघेही सांगतात. विनोबा म्हणतात की, जोपर्यंत आपण मनाच्या भूमिकेच्या वर येत नाही, तोपर्यंत विज्ञान-युगाला आपण लायक बनू शकणार नाही. भावना, वासना, कामना, आशा-निराशा, आसक्ती, प्रेम-द्वेष, मान-अपमान या मानसिक वृत्ती माणसात कार्यरत असतात. यांतून माणसाला वर उठले पाहिजे. मनुष्य जर मनाच्या भूमिकेत राहिला, तर मनाचा मनाशीच संघर्ष होत राहील व अन्योन्य विरोध होईल. म्हणून माणसाने मनोविचारांच्या वर उठले पाहिजे. आपण जर मनाच्या वर निघण्याचा प्रयत्न करू, तरच जी विज्ञानशक्ती आपल्या हातात आली आहे तिचा आपणास उपयोग करता येईल.

विनोबा म्हणतात, 'जसे विज्ञान मनाला महत्त्व देत नाही, तसेच आत्मज्ञान पण मनाला महत्त्व देत नाही. आपण मनाला वश व्हावयाचे नाही; मनाचे साक्षी बनून वर्तन करावयाचे आहे. आज विज्ञान आणि आत्मज्ञान ह्या दोघांचा हल्ला मनावर होत आहे. आज जो मनाच्या वर उठू शकेल, तोच जगाला जिंकेल.'

**तटस्थ बुद्धी व अक्षोभ वृत्ती**

व्यावहारिक व सामाजिक बाबतीत माणसाने तटस्थ बुद्धी राखली पाहिजे. बुद्धीला निरुपाधिक राखून, वैज्ञानिक दृष्टीने विचार करण्याचा अभ्यास केला पाहिजे, असे विनोबा आग्रहपूर्वक सांगतात. म्हणून विनोबा म्हणतात, 'ज्या चित्तात विकाराचा स्पर्श नाही, अहंता-ममता नाही, संकुचित भाव नाही – ह्या तऱ्हेचे जे निरुपाधिक चित्त असेल, तेच समत्वयुक्त चित्त होय. मन जे स्थानिक बाधांनी बनले आहे, त्यातून मुक्त झाल्याशिवाय पर्याय नाही. अक्षोभ अवस्था विज्ञानयुगात अत्यंत आवश्यक आहे.'

या विज्ञानयुगात शीघ्र निर्णय घेण्याची शक्ती तसेच त्याची अंमल करण्याची शक्ती आली पाहिजे. अशा निर्णयशक्तीच्या विकासासाठी निर्विकार वृत्ती आणि तटस्थ बुद्धीची गरज आहे. विज्ञानाच्या आजच्या जमान्यातील हा अनुभव घेऊनच गांधीजींनी गीतेतील स्थितप्रज्ञ-लक्षणाचा पाठ प्रार्थनेत अंतर्भूत केला होता, हे विनोबा अधोरेखित करतात.










विनोबांचे म्हणणे असे की, विज्ञानाला सृष्टीच्या चैतन्यमयतेचे जसे भान होऊ लागले आहे, तसेच व्यावहारिक प्रश्नांचे भान अध्यात्माला यायला हवे. त्याने इहलोकातील व्यावहारिक समस्यांचे निराकरण केले पाहिजे. विज्ञानाच्या कसोटीला जो पूर्णतः उतरेल, तोच खरा धर्म असेल. आणि अशा धर्माच्या आचरणातून अध्यात्माचा प्रचार होईल, असे विनोबांचे प्रतिपादन आहे.

अखेर विनोबा म्हणतात, 'विज्ञानाची दृष्टी जेव्हा सर्वोदय विचाराशी जोडली जाईल, तेव्हाच ती समर्थ बनेल. विज्ञानाचे खरे सामर्थ्य तेव्हाच प्रकट होईल. विज्ञानासाठी सर्वोदय विचार प्राणवायू आहे!'

विनोबांचे सर्व धर्म व विज्ञानविषयक चिंतन त्यांच्या 'सर्वोदय' शब्दात आले आहे. विनोबांसाठी सर्वोदय हा पूर्ण मंत्र आहे. तो पूर्ण, सत्य व शुद्ध आहे. हा मंत्र आमच्याही ओठावर असू दे. आचरणात असू दे.

**धर्म आणि विज्ञान : विनोबांचे ठळक विचारबिंदू**

१) मानवी जीवन ज्या नीतिविचारावर आधारलेले असते, त्याला धर्म म्हणतात.

२) श्रद्धा, सत्य, प्रेम व त्याग ही धर्माची चार पायाभूत तत्त्वे आहेत.

३) आजचे सर्व धर्म हे धर्म नसून पंथ आहेत.

४) सर्वच धर्म मानसिक भूमिकेवर राहिल्याने खऱ्या धर्माची स्थापना अजून झालेली नाही.

५) धर्म जेव्हा विज्ञानाच्या भूमिकेवर येईल, तेव्हाच खरा धर्म बनेल.

६) धर्म व अध्यात्म यांत फरक आहे. धर्म बाह्य गोष्टींसाठी आदेश देतो. अध्यात्म म्हणजे सत्य-प्रेम-करुणा.

७) राजनीती व धर्म-पंथ नष्ट होतील व फक्त अध्यात्म व विज्ञान टिकेल.

८) विज्ञान नीतिनिरपेक्ष असल्याने त्याला अध्यात्माची जोड हवी.

९) राजनीती + विज्ञान = सर्वनाश

अध्यात्म + विज्ञान = सर्वोदय.

१०) सृष्टी अगर प्रकृती ह्यात जे चालते, त्याच्या नियमांचे जे शोध घेते ते विज्ञान होय.

११) विज्ञान विराट सृष्टीचा शोध घेते तसेच सूक्ष्म अणूच्या शक्तीचे आकलन करीत आहे. विज्ञानयुगाची ही दोन मुख्य लक्षणे.

१२) विज्ञान सृष्टीला जड मानते तर ब्रह्मवाद सृष्टीला चेतन मानतो.

१३) विज्ञान व अध्यात्म सत्याचा शोध घेतात. हे समान तत्त्व.

१४) मनुष्याने मनाच्या वर उठले पाहिजे, असे अध्यात्म व विज्ञान दोघेही सांगतात.

१५) व्यावहारिक व सामाजिक बाबतीत माणसाने तटस्थ बुद्धीने व वैज्ञानिक दृष्टीने विचार करण्याचा अभ्यास केला पाहिजे.

१६) विज्ञानयुगात शीघ्र निर्णय घेण्याची व अंमल करण्याची शक्ती आली पाहिजे. त्यासाठी तटस्थ बुद्धीची आवश्यकता आहे.

१७) विज्ञानाच्या कसोटीला उतरेल तोच खरा धर्म असेल.

१८) धर्माने व्यवहाराची सर्व नाकी काबीज केली पाहिजेत. बाजाराचा व राजकारणाचा त्याला विटाळ असता कामा नये.

१९) जो धर्म संपूर्ण अर्थाचे नियमन करू शकत नाही, तो खरा धर्मच असू शकत नाही.

२०) विज्ञान व अध्यात्म यांद्वारे मानवप्रेमाचा धर्म स्थापन करावयाचा आहे. त्यात पूजा-अर्चा राहणार नसून मानवसेवा येईल.

२१) धर्मापासून नव्हे, तर धर्मसंस्था व धर्मगुरूंपासून सुटका करून घेण्याची गरज आहे.

२२) सर्व धर्म समान असल्याने धर्मांतराची गरज नाही. संख्यावृद्धीने धर्मविकास होत नाही.

२३) अठरा वर्षे वयानंतर प्रत्येकाने अभ्यासपूर्वक आपला धर्म जाहीर करावा.

२४) अनेक भेदांतून अभेद निर्माण करणे, हे धर्माचे कार्य असले पाहिजे. जर धर्म हे कार्य करू शकला नाही, तर तो व्यर्थ ठरेल.

२५) सर्वधर्मसमभावात चार गोष्टी महत्त्वाच्या - (१) स्वधर्मनिष्ठा, (२) इतर धर्मांबद्दल आदर, (३) सर्वधर्मसुधारणा, (४) अधर्माचा विरोध.

२६) वेदापूर्वी ईश्वरी वचन असू शकत नाही वा पैगंबरानंतर कोणतेही ईश्वरी वचन असणार नाही, असे मानणे म्हणजे अंधश्रद्धा व दुराग्रह.

२७) धर्माचा विकास करायचा असेल तर त्याला सत्तेशी व राज्याशी जोडू नका.

२८) शरीरागत, शरीराला ओळखणारे, शरीराहून भिन्न तत्त्व जो आत्मा आहे, तसेच सृष्टीत राहणारे, सृष्टीला ओळखणारे, सृष्टीहून भिन्न तत्त्व अर्थात अधिष्ठानरूप जे तत्त्व, अर्थात अधिष्ठानशक्ती म्हणजेच ईश्वर.

२९) अहिंसा, सत्य, अस्तेय ... इ. एकादश व्रते हे धर्माचे दूध असून सर्व धर्मांचे सार आहे.

३०) जीवनशुद्धीच्या साधनेनेच धर्मचिंतन परिपूर्ण होते व जीवनशुद्धीसाठी एकादशव्रतांची आवश्यकता आहे.

जय जगत्!














# 'शुद्ध धर्माचा शोध' (नवे धर्मशास्त्र)

राजीव पागे

**प्रस्तावना**

मी 'धार्मिक जीवन व वैज्ञानिक दृष्टिकोण' ह्या विषयावर परिसंवाद ठेवल्याबद्दल आयोजकांचे आभार मानतो. कारण अंतरकरांपुढे असलेले प्रश्न आपणा सर्वांपुढेही आहेतच. श्री. अंतरकरांच्या लेखाच्या निमित्ताने ह्या विषयासंबंधी वाचण्याची व चिंतन करण्याची संधी मिळाली.

'धर्म' हा शब्द फारच विविध व व्यापक अर्थाने वापरला जातो व त्यामुळे गोंधळ व्हायची शक्यता असते. म्हणून मी कर्तव्याला कर्तव्य म्हणेन, स्वभावाला स्वभाव म्हणेन, पारंपरिक धर्माला धर्म व आदर्श धर्माला शुद्ध धर्म म्हणेन. अंतरकरांच्या लेखाचे परीक्षण/ समीक्षण करण्यापेक्षा, त्या लेखाला प्रतिसाद द्यायला मला आवडेल. माझ्या विचारांवर प्रा. सुरेंद्र बारलिंगे, प्रा. राजेंद्र प्रसाद व कांट यांच्या विचारांचे गुरुऋण आहे.

भारतीय विचारधारेप्रमाणे नैतिक संकल्पना व तत्त्व नीतिशास्त्र म्हणून येत नाही, तर ते धार्मिक तत्त्वे व धार्मिक नियम म्हणून येतात. अनुशासनपर्व व शांतीपर्व, हितोपदेश व पंचतंत्र यांतील कथा, जैन कथा व बौद्धांच्या जातक कथा, पुराणे यांतून त्या मांडल्या जातात.

हिंदू धर्मात 'धर्म' हे नीतीचे अधिष्ठान समजल्याने नीतीपेक्षा धर्म वरच्या स्थानावर गेला. धर्माची कर्मकांडे केल्यावर 'नीती' पाळली नाही तरी चालेल, अशी मुजोरी समाजात आली. समाज धार्मिक पण अनीतीने वागणारा झाला. धर्मापेक्षा नीतीला दुय्यम स्थान दिले गेल्याचे परिणाम आज आपण भोगत आहोत. भ्रष्टाचारी लोकांची व देवस्थानांची संपत्ती वेगाने वाढताना दिसत आहे.

कांटप्रमाणे 'धर्म' नीतीचे अधिष्ठान नसून 'नीती' धर्माचे अधिष्ठान आहे. धर्म व नीती यांत विरोध निर्माण झाल्यास नीती श्रेष्ठ असली पाहिजे. त्याने रिलिजनच्या (पूर्ण नाव Religion within Limits of Reason Alone) चौथ्या भागात दिलेली धर्माची व्याख्या व त्यावरील तळटीपा महत्त्वाच्या आहेत. तो म्हणतो, 'धर्म म्हणजे (वैयक्तिक पातळीवर विचार करता) सर्व कर्तव्ये दैवी आज्ञा आहेत, अशी जाणीव होय.'

**कांटच्या तळटीपा**

१. धर्म म्हणजे सैद्धान्तिक ज्ञान नसून नैतिक प्रवृत्ती आहे. धर्म म्हणजे ईश्वराच्या आज्ञा समजून सर्व कर्तव्यांचे पालन करण्याची ही नैतिक प्रवृत्ती म्हणजे सैद्धान्तिक श्रद्धाच म्हणावी लागेल.

२. धर्माशी बांधली गेलेली आपली कर्तव्ये ही ईश्वराच्या बाबतीतली कर्तव्ये नसतात; तर ती मानवांशी संबंधित कर्तव्ये असतात. (हा विचार मानवकेंद्री आहे, हा ह्या विचाराचा उणेपणा आहे, असे मला वाटते.) ईश्वराने मानवांकडून काहीच प्राप्त करायचे नसते.

३. धर्मासाठी ईश्वरविषयक सैद्धान्तिक ज्ञानाची आवश्यकता नसते; कारण असे ज्ञानच उपलब्ध नसते. धर्मासाठी ईश्वराच्या अस्तित्वाची नव्हे, तर ईश्वर या संकल्पनेची आवश्यकता आहे.

कांट म्हणतो, "नीतिमत्ता हीच धर्माचे अधिष्ठान आहे. त्यामुळे नीतिमत्तेशी संबंध नसलेल्या घटकांचा (पूजा, प्रार्थना इत्यादी) विचार ईश्वराच्या संदर्भात करणे म्हणजे 'अंधश्रद्धेतून उद्‌भवणारा मूर्खपणा' व मूलतत्त्ववादातून निर्माण झालेला वेडेपणा आहे."

'धर्म' हे नीतीचे अधिष्ठान नसून 'नीती' ही धर्माचे अधिष्ठान आहे हे आधारविधान स्वीकारल्यावर 'नीतिमूल्यांचा समुच्चय' वा 'नीतिमूल्यांचा व्यूह' हेच धर्माचे स्वरूप ठरते. उदा., हिंदू धर्मातील रामायण व महाभारत हे दोन नीतिव्यूह आहेत. अजूनही काही असतील.

* कैकयीने रामाला वनवासात पाठवायचा वर घेतल्यावर, लक्ष्मण तिला मारायला निघतो व क्षात्र धर्माप्रमाणे त्याला तो अधिकार असतोही; पण राम त्याला इथे 'आई-वडिलांच्या इच्छांचा मान' हा साधारण धर्म हाच स्वधर्म असल्याचे सांगतो.

* श्रीकृष्ण मात्र अर्जुनाला साधारण धर्मापेक्षा वर्णधर्म श्रेष्ठ असल्याचे सांगतो. तोच स्वधर्म अशी ग्वाही देतो. कोणता नैतिक व्यूह निवडायचा, हा प्रत्येकाचा प्रश्न






ठरतो.

**धर्म व विज्ञानाची क्षेत्रे**

धर्म व विज्ञानाची क्षेत्रे बघण्यापूर्वी आपण प्रा.बारलिंगे ह्यांची सत्, ऋत व अनृत या विषयाची मांडणी बघू.

आपण ज्याला जगत् किंवा विश्व म्हणतो, वैशेषिक त्याला द्रव्य म्हणतील, सांख्य त्याला प्रकृती म्हणतील, पूर्वमीमांसक त्याला भूत म्हणतील, त्या अंतिम सत्तेचे (Ultimate reality ) दोन भाग होतात. त्याचा जो स्थिर भाग आहे (being), त्याला सत् म्हणता येईल व जो बदलणारा भाग आहे (becoming), त्याला ऋत म्हणता येईल. ऋतचे अधिकार हे नैसर्गिक नियम होतील. अनृत (अन् + ऋत) म्हणजे ऋतच्या विरोधी नसून त्यात अन्योन्य भाव आहे. जे ऋत नाही तो अनृतमध्ये येणार. शुद्ध धर्म हाही अनृताचा भाग आहे. कला, नीती, धर्म या सर्व मानवरचित गोष्टी आहेत.

**सत् व ऋतविषयी ज्ञान हा विज्ञानाचा विषय आहे.** इथे फक्त - तथ्ये (facts) असतात; मूल्ये (value) नसतात. उदा., विज्ञानात लोखंड कसे असावे वा त्याचे गुणधर्म काय असावेत हे प्रश्न गैरलागू आहेत. लोखंड म्हणजे काय? लोखंडाचे गुणधर्म कोणते? ह्याचा अभ्यास होऊ शकतो.

अनृतात म्हणजे नीती, सौदर्य या बाबतीत आपण कसे असावे, हे ठरवू शकतो. चांगली नीती कोणती? काय सुंदर आहे वा काय असुंदर आहे, इथे निवडीला वाव आहे. कारण ह्या मानवी विश्वातील कल्पना आहेत.

सत् व ऋत हा वास्तवाचा (is) भाग आहे, तर अनृत आदर्श (ought) चा शोध घेते. इथे निवडीची संधी आहे. इथे मूल्ये (values) असणार; तथ्ये (facts) नसणार.

**म्हणजेच शुद्ध धर्म व विज्ञान ह्यांची क्षेत्रे वेगळी. शुद्ध धर्म मूल्यांविषयी बोलणार, तर विज्ञान तथ्यांविषयी बोलणार. त्यामुळे शुद्ध धर्माविषयी वैज्ञानिक दृष्टिकोण वापरायचा प्रश्न मला असंगत वाटतो.**

तसेच तथ्यांकडून मूल्यांकडे आपणास कोणत्याही तार्किक पद्धतीने जाता येत नाही. तथ्य व मूल्य ह्यांत अनुल्लंघ्य अशी दरी आहे व अशी एकही तार्किक वा बौद्धिक अनुमानप्रक्रिया नाही की, जीमुळे ही दरी आपण ओलांडू शकू. केवळ वस्तुस्थितिवाचक विधानावरून कोणतेही मूल्यविधान निष्कसित करता येत नाही. कर्मधान बुद्धी स्वायत्त आहे असे हिरिरीने मांडून नैतिक अनुभवाची स्वायत्तता कांटने का जोपासली, हे आपणाला यामुळे कळून येते. (परामर्श, खंड २८, अंक १, पान १११.)

शुद्ध धर्माचे कार्य व विज्ञानाचे कार्य ह्यांत स्वरूपतः भेद असल्यामुळे 'धर्म की विज्ञान' हा पर्याय, 'सहृदयता की तार्किकता' असा विपर्यस्त पर्याय ठरेल. हे दोन पर्याय नसून ती मानवाची जीवनाची परस्परपूरक अंगे आहेत. रोग व रोगाची कारणे हा विज्ञानाचा (वैद्यक शास्त्राचा) अधिकार. तेथे धार्मिक क्षेत्राने ढवळाढवळ करून उपयोग नाही. रोग बरा होण्यासाठी धर्माची लुडबूड स्वीकारल्यास अंधश्रद्धा होईल. विज्ञानात प्रथम ज्ञान व मग श्रद्धा, तर पारंपरिक धर्मात प्रथम श्रद्धा व मग ज्ञान अशी ऊफराटी रीत असते.

तात्पर्य, धर्मासाठी नीतिविचार-नीतिमूल्ये एवढेच क्षेत्र राहते. धर्माने वस्तूविषयी बोलू नये. तसेच सद्वस्तू (Metaphysics) विषयीही बोलू नये. तो धर्माचा प्रांत नाही. त्यामुळे विसंगतीचा, किंवा धर्म विज्ञानविरोधी होण्याचा प्रश्न उद्‌भवणार नाही. त्याचप्रमाणे वैज्ञानिक दृष्टिकोण वापरावा का नाही, हा केवळ नीतीचा प्रश्न आहे; विज्ञानाचा नाही. विज्ञानाचा वापर मानवी मांगल्यासाठी करायचा का विध्वंसासाठी करायचा, हाही नैतिक प्रश्न आहे. विज्ञानाचा नाही.

विज्ञान न-नीती आहे.

नीती न-वैज्ञानिक आहे.

नैतिक आचरण व कलांचा आस्वाद घ्यायची क्षमता ह्या विज्ञानाच्या नियमवादी चौकटीत बसत नाहीत, म्हणून माणूस वैज्ञानिक दृष्टीने गूढ ठरतो.

**धर्माचा आवाका (क्षेत्र)**

एकदा धर्माचा आवाका फक्त नीतिमूल्ये व नीतिव्यूह एवढाच ठरवल्यानंतर नीतीचा आवाका कोणता हे शोधणे आले, नैतिक संकल्पनांचा उगम शोधणे आले.

प्रा. बारलिंगे यांच्या मांडणीप्रमाणे प्रथम देवघेव - संबंध, संबंधातून ऋणसंकल्पना, ऋणसंकल्पनेतून कर्तव्यसंकल्पना, त्यातून पुढे पुरुषार्थसंकल्पना व त्यातून

होणारी नीतिसंकल्पना व शेवटी शुद्ध धर्म ही संकल्पना.

माणसाचे संबंध चार प्रकारचे असतात.

१. माणसाचे इतर माणसांशी संबंध,

२. माणसाचे जगताशी संबंध,

३. माणसाचे स्वत:शी संबंध आणि

४. माणसाचे अनीतीशी संबंध.




**ऋण व पुरुषार्थ**

'अ' ला स्वत:च्या इच्छा पुऱ्या करताना 'ब' ची गरज लागते. आदिम-काळात शिकार करताना, पुनरुत्पादनासाठी व आजच्या काळात याशिवाय अर्थार्जनासाठी, खेळासाठी 'अ' ला 'ब' ची गरज लागते. त्यामुळे अ हा, ब व जगतावर अवलंबून असतो. याप्रमाणे 'ब' हा, 'अ' व जगतावर अवलंबून असतो. पण जगत् काही 'अ' व 'ब' वर अवलंबून नसते. ते त्याच्या स्वभावाप्रमाणे किंवा ऋतूच्या नियमाप्रमाणे बदलत राहते. त्याला स्वत:चा दृष्टिकोण वा अपेक्षा नसतात. पण 'अ' व 'ब' चे तसे नसते. 'अ' व 'ब' जसे एकमेकांवर अवलंबून आहेत, तसेच त्यांचे एकमेकांविषयी दृष्टिकोण आहेत, अपेक्षा आहेत. त्यामुळे ते एकमेकांचे देणे लागतात (ऋणसंकल्पना). 'अ' हा 'ब' ला देणे लागतो, हे बरोबर; पण तो ते देणे टाळू शकतो. घेतलेले परतफेड करणे ही मानवी संकल्पना आहे. ती निसर्गनियमात येत नाही. आज 'अ' ने 'ब' च्या मदतीची परतफेड केली नाही, तर उद्या ब त्याला मदत करणार नाही व त्यात अ चे नुकसान आहे. त्यामुळे परतफेडीची जबाबदारी हा मानवी नैतिक विश्वाचा नियम होऊन बसतो. तो त्याचा पुरुषार्थ होऊन बसतो. म्हणून बारलिंगे म्हणतात, 'पुरुषार्थ ऋणसंकल्पनेतून येतो.'

प्रा. बारलिंगे यांच्या मांडणीप्रमाणे माणसाला कर्तेपणाची व नवनिर्माणाची आस असते. तो एकटा खूप काही करू शकत नसेल, तरी तो जगतातील वस्तू घेऊन, ब ची मदत घेऊन ते करू शकतो. त्यामुळे

'अ' हा जगताचा ऋणी आहे.

'अ' हा ब चा ऋणी आहे.

**१. माणूस-माणूस संबंध**

'अ' हा 'ब' चा ऋणी असल्याने, 'ब' ला लागेल तेव्हा मदत करणे हे त्याचे कर्तव्य होते. ते कर्तव्य पूर्ण करणे हा पुरुषार्थ होतो व त्यातून नैतिक मूल्यांचा उगम होतो, हे आपण पाहिले.

भारतीय विचारधारेप्रमाणे ही नीतिमूल्ये आपल्याला धर्माकडून मिळायची. आता धर्माची जागा शासन (State) घेत आहे व शासन कायद्याद्वारे ही नीतिमूल्ये लादते. कर्तव्य मात्र आतून येते. ते स्वत:मूल्य आहे व कशाचेही साधन नाही.

संविधान हे ढोबळ व महत्त्वाचे हक्क देते. पण कायदे चुकीचे असू शकतात. प्रत्येक मानवी व्यवहार - -आचार कायद्याच्या चौकटीत आणता येणार नाही, त्यासाठीची नीतिमूल्ये विवेकातून (Reason) किंवा शुद्ध बुद्धीमुळे मिळू शकतात. उदा., आजच्या आसुरी व वाढत्या उपभोगामुळे आपण पुढच्या पिढ्यांचा हक्क हिरावून घेतो का व या संबंधात प्रत्येकावर येणारी जबाबदारी कोणती?

ऋषीऋण, गुरुऋण व समाजऋण ह्या नैतिक चौकटीतून येतात. ह्या नैतिक चौकटीची मांडणी करणे शुद्ध धर्माची जबाबदारी आहे.

**२. माणूस-जगत् संबंध**

माणूस अन्न, वस्त्र व निवारा यांसाठी निसर्गावर अवलंबून होता, आजही आहे व भविष्यातील पिढ्याही असणार आहेत. माणसाने निसर्गाप्रति वागण्याची नीती ह्या संबंधातून येते.

* देवाने माणसाला पृथ्वी उपभोगाला दिली — एक धर्म

* अर्जुनाने खांडववन व नाग जाळून राजधानी वसवली – महाभारत.

* आजही आपण प्राण्यांशी कसे वागतो? अंडी देणाऱ्या कोंबड्यांत नराची गरज नसते. अंड्यात असेपर्यंत लिंग कळत नाही. जन्मानंतरच लिंग कळते. निम्मे नर असतात

व त्यांचा काही उपयोग नसतो. त्यामुळे त्यांचे तुकडे करून उरलेल्या पिल्लांना खाद्य म्हणून देतात.

सखोल पर्यावरणवादी म्हणतात, 'स्त्रियांना, अस्पृश्यांना व गुलामांना समान हक्क दिल्याने नीती पुढे गेली. नीतीचा परीघ वाढल्याने नीतीचे उन्नयन होते. मग नीतीचा परीघ अजून वाढवून आपण त्यात प्राणी, वनस्पती व चराचर ह्यांना का आणू नये? नीतीचे अधिक उन्नयन व्हायला नको का?'

कसे वागायचे आपण प्राणी, वनस्पती व निसर्गाबरोबर? ह्या पर्यावरणवादी नीतिमूल्यांची शिकवण द्यायची जबाबदारी शुद्ध धर्माची असू शकेल.

निसर्गऋण ह्या चौकटीत येईल.

**३. माणसाचा स्वतःशी संबंध**

माणसाने स्वतःच्या इंद्रियांचा मान ठेवून त्या इच्छा पुऱ्या करणे हा झाला कामपुरुषार्थ. अभ्युदयामध्ये 'काम' हे ध्येय असून 'अर्थ' व 'धर्म' ही त्याची साधने आहेत. पंचेंद्रियांचे समाधान हा एक भाग झाला. पण बाकीच्या अवयवांबाबत काय? स्नायू, जठर, हृदय ह्यांमुळेच ही पंचेंद्रिये आपल्याला उपभोगाचा आनंद देतात, मग ह्या अवयवांबाबत आपली कर्तव्ये नाहीत का? हृदयावर अतिताण येऊ न देणे, व्यायाम करणे ही माझी कर्तव्ये नाहीत का? नाहीतर त्यांचे ऋण कसे फेडायचे?

कायम विसरले जाणारे इंद्रिय म्हणजे 'मन'. मानसिक शांती व निरामय आनंद ह्यासाठी चिंतन, ध्यान ह्यासाठी वेळ देणे हेही माझे कर्तव्य होईल. एवढीच मी नीतीची चौकट मानतो. कुणाच्या तरी सांगण्याप्रमाणे वैचारिक पद्धती स्वीकारणे हे मला आदेशरूप वाटते. त्यातून पोथीनिष्ठता तयार होईल, अशी भीती वाटते. कृष्णमूर्तींची विचारपद्धती विवेकावर पारखून स्वीकारायला काहीच हरकत नाही. ह्या अंगाने मला एकच विचारपद्धती नीतीचा-धर्माचा अधिकार वाटत नाही. विचारपद्धती आतून कर्तव्य म्हणून येण्याचे स्वातंत्र्य असताना बाहेरून काही लादायची गरज काय? दिशा दाखवली म्हणजे पुरे झाले.

मी ह्या दोन्ही कर्तव्यांना शरीरऋणांतून आलेले मानतो.

**४. माणूस-अतीत संबंध**

अतीत आहे का नाही, हा प्रश्न इथे नाही. अतीताविषयी काय नीती असावी हा आहे. मला अतीताची काही प्रचिती नाही. त्याचे माझ्यावर काय ऋण आहेत, याचीही अनुभूती नाही. त्यामुळे त्याच्याप्रति माझे काय कर्तव्य असणार व माझी काय नीती असणार, याविषयी अंधार आहे.

अज्ञेयवादी भूमिका घेऊन त्या दिशेची खिडकी बंद न करता उघडी ठेवणे एवढीच नीती होऊ शकेल.

**शुद्ध धर्माच्या आचरणाचे फळ**

नैतिक आचरण म्हणजेच शुद्ध धर्माच्या आचरणाचा व बक्षीस वा शिक्षा ह्यांच्याशी रूढ पद्धतीने संबंध जोडता येणार नाही. नैतिक/शुद्ध धार्मिक कृतीमध्येच तिचे बक्षीस अंतर्भूत असते. त्यातील आनंद, समाधान व सार्थकता हेच त्याचे बक्षीस. म्हणजेच नैतिक/शुद्ध धार्मिक आचरणाचे मागाहून मिळणारे बक्षीस नसते; ते नैतिक आचरणाचे अविभाज्य अंग असते.

मी शुद्ध धर्माविषयी माझे मत मांडले म्हणजे विज्ञान महत्त्वाचे नाही, असे मुळीच नाही. आदर्श जीवनासाठी विज्ञान व धर्म (नीती) दोन्हींची गरज आहे. माणसाला स्वतःचा व इतरांचा ऐहिक सुखाचा स्तर उंचावण्यासाठी, दैन्य, दारिद्र्य, रोगराई व अमंगलता कमी करण्यासाठी, तसेच नैसर्गिक आपत्तीला तोंड देण्यासाठी विज्ञान व वैज्ञानिक दृष्टिकोण ह्यांचे फार महत्त्व आहे. इथे विज्ञानसाधना हे नैतिक कर्तव्य होते, असे मला वाटते. बालमृत्यू कमी करणे, चक्रीवादळाला तोंड देणे, देवी व पोलिओचे उच्चाटन ह्यांत विज्ञानाचा मोठा वाटा आहे.त्याचप्रमाणे माणूस-जगत् संबंधात, आपण विज्ञान-तंत्रज्ञानाचा चुकीचा वापर करून जगताचा स्तर प्रदूषणाने खालावतो व त्यामुळे पुढील पिढ्यांवर काय अन्याय करतो हे जाणण्यासाठी प्रगत वैज्ञानिक ज्ञानाची गरज राहणार आहे. म्हणजेच विज्ञान तीनही ऐहिक संबंधांना व्यापून राहते व अभ्युदयात नीतीइतकीच महत्त्वाची भूमिका निभावते.



## लेखकांचा परिचय

 **प्रा. राम ताकवले**

माजी कुलगुरू पुणे विद्यापीठ, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक; इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठ, दिल्ली या संस्थांमध्ये कार्यरत. मुख्य, महाराष्ट्र नॉलेज फाउंडेशन; राष्ट्रीय स्तरावरील शिक्षणविषयक संस्थांचे अध्यक्ष. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील अनेक पुरस्कार व सन्मान प्राप्त.

E-mail : takwale. ram @gmail. com दूरध्वनी :–(०२०) २५८८४९८२.

 **डॉ. जयंत नारळीकर**

प्रसिद्ध शास्त्रज्ञ. खगोलशास्त्र व विश्वरचनाशास्त्र यांचे अभ्यासक. विविध क्षेत्रांत मोठी कामगिरी करणारे विद्वान.

jayant @ iucaa.ernet.in
jnarlikar @ yahoo.com
दूरध्वनी :– (०२०) २५६०४१००, २५६९१४१४.

 **प्रभाकर देवधर**

ज्येष्ठ वैज्ञानिक. APLAB चे संस्थापक. १९८२ ते १९९१ पर्यंत पंतप्रधान राजीव गांधी यांचे वैयक्तिक सल्लागार. १९८६ ते १९८८ भारत सरकारच्या इलेक्ट्रॉनिक्स कमिशनचे अध्यक्ष.

psdeodhar @ aplab. com भ्रमणध्वनी :– ९८२०१४२३५८.

 **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.

दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

 **राजीव साने**

कामगार संघटनांचे सल्लागार आणि विविध विषयांचा मार्मिक अभ्यासक करणारे अभ्यासक. नवपार्थगीता नावाचे पुस्तक प्रसिद्ध. विविध वृत्तपत्रांत स्तंभलेखन.

rajeevsane @ gmail.com दूरध्वनी :- (०२०) २५४३६५८३

 **वि. प्र. दिवाण**

सर्वोदयाचे पूर्णवेळ कार्यकर्ते. गेली तीस वर्षे विनोबांच्या जन्मघरात व जन्मगावी गागोदे बुद्रुक, ता. पेण जि. रायगड येथे राहून कार्यरत. विनोबांच्या विचारानुसार मृतगुरांच्या शवच्छेदनाचे काम करतात. या विषयावर पुस्तक प्रकाशित. 'आचार्य विनोबा भावे', 'परचुरेशास्त्री', 'नरहर शंभुराव भावे' ही चरित्रे प्रकाशित.

***पत्ता*** :- मराठी संशोधन केंद्रप्रमुख, एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक. भ्रमणध्वी :– ९२२६१२२२९९.

 **राजीव पागे**

प्रसिद्ध उद्योजक. शिक्षण : यांत्रिकी अभियंता. एम्. एम्. एस् , एम्. ए., तत्त्वज्ञान; एम्. फिल. चालू आहे. अर्थशास्त्र व पर्यावरणनीती यांतील आवड.

rajeev.page @gmail.com भ्रमणध्वी :– ९८५००२२२४४.

अनुक्रमणिका

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

**छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत' ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २०१४ पासून रू. ४००/– इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.**

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.






छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत' ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २०१४ पासून रू. ४००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.

अनुक्रमणिका








हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई